

नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १४ वें ]   मे १९६१   [ अंक ८


सार-संकलन . . . . . . . . .

'गुरुदेव रवीन्द्रनाथ ठाकूर यांचें जीवनदर्शन' . डॉ. ग. ना जोशी

उर्वरित कार्ल मार्क्स . . प्रा. सिडमे हूक् अनु० अशोक शहाणे

विश्वाच्या उत्पत्तीविषयीचे दोन आधुनिक सिद्धांत :२: श्री. अद्वयानंद गळतगे

छत्रपति संभाजी महाराज – ( परीक्षण ) . श्री. शां. वि. आवळसकर

पेशवे दप्तर . . . . . श्री. श्री. रा. टिकेकर

इराणमधील राजकीय परिवर्तनाची समस्या . श्री. भा. कृ. देसाई

–वाचकांचा पत्रव्यवहार–


वार्षिक वर्गणी ९ रु. ]   [ किरकोळ अंक १ रु.






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

वर्ष चौदावें
अंक आठवा

# नवभारत

मे
१९६१

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक


| | | |
|---|---|---|
| सार-संकलन | | १–१३ |
| 'गुरुदेव रवीन्द्रनाथ ठाकूर यांचें जीवनदर्शन' | डॉ. ग. ना. जोशी | १४–२४ |
| उर्वरित कार्ल मार्क्स | प्रा. सिडने हूक् अनु० अशोक शहाणे | २५–३२ |
| विश्वाच्या उत्पत्तीविषयीचे दोन आधुनिक सिद्धांत :२: | श्री. अद्वयानंद गळतगे | ३३–४३ |
| छत्रपति संभाजी महाराज – (परीक्षण) | श्री. शां. वि. आवळसकर | ४४–५१ |
| पेशवे दप्तर | श्री. श्री. रा. टिकेकर | ५२–६१ |
| इराणमधील राजकीय परिवर्तनाची समस्या | श्री. भा. कृ. देसाई | ६२–६४ |
| वाचकांचा–पत्रव्यवहार – | | ६५–६६ |


वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई (जि. सातारा)

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | धर्मकोश- व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... | ... ... | ५२-०-० |
| | कापडी बांधणी ... | ... ... | ६४-०-० |
| (२) | धर्मकोश- उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... | ... ... | ११०-०-० |
| | कापडी बांधणी ... | ... ... | १२६-०-० |
| (३) | धर्मकोश- संस्कारकाण्ड भाग १ ला | .... | ४५-०-० |
| (४) | मीमांसादर्शन ... ... ... | ... | ३०-०-० |
| (५) | मीमांसाकोश ... भाग १ ते ५ | | १६५-०-० |
| (६) | कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... | ... | ६-०-० |
| (७) | हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ... | ५-०-० |
| (८) | वैदिक संस्कृतीचा विकास ... .. | ... | ६-०-० |
| (९) | नवमानवतावाद ... ... ... | ... | २-८-० |
| (१०) | मानवाचा आदर्श ... ... ... | ... | ३-०-० |
| (११) | चार्वाक- इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | ... | ३-०-० |
| (१२) | गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) | ... | २-८-० |
| (१३) | छत्रपति संभाजी महाराज ( श्री. वा. सी. बेंद्रे ) | .... | १६-०-० |
| (१४) | महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना ( श्री. चा. अ. दाभोलकर ) | .... | २-०-० |

अनुक्रमणिका

# सार-संकलन

## प्रतिबंधक उपायांची सुरक्षितता

आण्विक अस्त्रांच्या युगांत एकाच्या क्षणिक चुकीनें सर्वांचा सर्वनाश होण्याची शक्यता निर्माण झाली आहे, असें सामान्यतः म्हटलें जातें. अमेरिकेनें तर गेल्या कांहीं वर्षांत प्रतिप्रहारात्मक उपाययोजनेवरच अधिक भर दिला आहे. तेव्हां चालू दशकांतल्या पाश्चिमात्य संरक्षण-योजनेविषयीं चर्चा करणारा श्री. जॉन स्ट्रॅची यांच्यासारख्या मुत्सद्याच्या International Affairs च्या जानेवारी अंकांतील ह्या लेखांत सर्वांनाच रस वाटेल.

ह्या विस्तृत विषयाच्या फक्त एकाच अंगाची– आण्विक अंगाची-चर्चा मी येथें करणार आहे; परंतु हेंच ह्या विषयाचें एकमेव वा कांहीं दृष्टींनीं तरी सर्वांत महत्त्वाचें अंग आहे, असें मात्र कोणी समजूं नये. उलट आण्विक क्षेत्रांत कांहीं विशिष्ट परिस्थिति जर गृहीत धरली वा तयार केली तर परंपरागत सैन्य व संरक्षणाचे उपायच सर्व दृष्टींनीं अतिशय महत्त्वपूर्ण ठरण्याची शक्यता आहे, असें माझें मत आहे. माझ्या समजुतीप्रमाणें हा प्रस्ताव आतां आपल्या परिचयाचा झाला आहे; परंतु कांहीं आत्यंतिक महत्त्वाच्या अटी आण्विक क्षेत्रांत पुऱ्या झाल्याशिवाय, हा प्रस्ताव प्रत्यक्षरूप होणार नाहीं, आणि ह्या अटींकडेच आपलें दुर्लक्ष्य होण्याचा धोका मला वाटत आहे.

दोन्ही प्रबळ पक्ष वा त्यापैकीं कोणताहि एक, आण्विक युद्धांतून संघटित समाज म्हणून टिकून राहील किंवा काय, या वादांत शिरण्याइतका गंभीरपणा सामान्य माणसाला वाटत नाहीं, असें मला वाटतें. ते टिकून राहतील, असें क्षणभर गृहीत धरलें, तरी जर जगाची रचना आहे तशीच राहणार असेल, आणि परंपरेनें चालत आलेला इतिहास त्याच मार्गानें वाटचाल करीत राहणार असेल, तर जग फक्त एकाच आण्विक युद्धाच्या अनुभवांतून जाईल, असें गृहीत धरायला काय सयुक्तिक कारण आहे. जर युद्ध हा आंतरराष्ट्रीय झगडे सोडविण्याचा सर्वमान्य उपाय म्हणून राहणार असेल, तर मग जगांत केवळ एकच आण्विक युद्ध होईल, असें मानण्यास काय जागा आहे ? 'महायुद्धें : एक ते सात' अशा स्वरूपाच्या शीर्षकाखालीं कांहीं अमेरिकन संरक्षण–तज्ज्ञांनीं लिहून काढलेलीं व्याख्यानें अर्थातच संपूर्णतया सयुक्तिक आहेत. त्यांनीं घेतलेल्या भूमिकेवरून त्यांचें तसें करणें पूर्णपणें सुसंगतच आहे, कारण युद्धाचीं कारणें अद्याप बदललेलीं नाहींत जगांतील राजकीय परिस्थिति जर आपण बदलली नाहीं तर हीं कारणें क्रियाशून्य होतील, असें मानतां येईलसें मला वाटत नाहीं. म्हणून, एकाच आण्विक युद्धानें जगांतील प्रमुख जमाती नष्ट होणार नाहींत, असें विधान करतां येणें जरी शक्य असलें, तरी अशा युद्धांची एक मालिका हा विनाश नक्कीच घडवून आणील. वर्ड्स्वर्थच्या The Preclude मधील 'The Earthquake is not satisfied at once' ह्या पंक्तीची आठवण होते. आणि म्हणून मला असें स्पष्टपणें वाटतें, कीं आतां केलेल्या व्याख्येनुसार आंतरराष्ट्रीय विवाद मिटविण्याचा एक उपाय म्हणून आण्विक युद्ध मान्य होण्याजोगें नाहीं.

नंतरचा प्रश्न असा, कीं आण्विक युद्ध जर मान्य होण्याजोगें नाहीं, तर तें निदान संभाव्य किंवा शक्यतेच्या कोटींतील तरी आहे का ? हा अतिशय विवाद्य प्रश्न आहे. अतिशय तज्ज्ञ व अभिज्ञ मतांतहि या विषयीं दोन सर्वस्वीं भिन्न प्रवाह प्रचलित आहेत. गेल्या दशकांत असलेला जुना किंवा ब्रिटिश (जरी तो ब्रिटनपुरता मर्यादित नव्हता) दृष्टिकोन आपण प्रथम तपासून पाहूं. 'उष्णताप्रधान आण्विक अस्त्रांच्या समृद्धीमुळें, सर्वांगीण युद्धानें आपला विनाश ओढवून घेतला आहे' असें म्हणतांना शाही विमानदलाचे अधिकारी सर जॉन स्लेसर यांनीं ह्याच दृष्टिकोनाचें प्रतिपादन केलें होतें. असें असेल, तर आण्विक युद्धाच्या अस्वीकृतीबद्दल वा परिणामांबद्दल चिंता बाळगण्याची वास्तविक कांहींच आवश्यकता नाहीं.








दुसऱ्या बाजूला नवा अमेरिकन- आणि रशियनहि- दृष्टिकोन आहे. हा अगदीं भिन्न दृष्टिकोन असणारे संरक्षण-तज्ज्ञ अमेरिकेंत व रशियांत आहेत, ह्या वस्तुस्थितीला आपण तोंड देणें महत्त्वाचें आहे. चालू दशकांत कदाचित् अधिकाधिक प्रसार पावणारा– त्याचें हें प्रसार पावणें योग्य असो वा अयोग्य असो– हा पर्यायी दृष्टिकोन माझ्या समजुतीप्रमाणें परिप्रेक्षेंतील दोन बदलांवर आधारलेला आहे. अण्वस्त्रांचा सांठा– बॉम्ब्ज् आणि इतर युद्धसामग्रीचा प्रत्येक पक्षाकडील प्रत्यक्ष आंकडा– यावरील भर कमी होऊन, तो आतां वाटवड्याच्या साधनांवर, वाहनांवर, युद्धसामग्री इकडून तिकडे नेतां येईल अशा बॉम्बवाहू विमानांवर वा inter-continental missiles वर वा आणखी कशावर, देण्यांत आला आहे, ही पहिली गोष्ट. उष्णताप्रधान आण्विक युद्ध म्हणजे परस्परांच्या शहरांवरील बॉम्बफेक, ह्या पूर्वीच्या गृहीतकृत्यावरहि आतां भर उरलेला नाहीं. निदान प्रारंभीं तरी, दोन्ही बाजूंचे हल्ले–निदान पहिली चढाई तरी–मुख्यत्वेंकरून शत्रुपक्षाच्या शहरांवर न होतां, त्याच्या वाहतुकीच्या साधनांवर–विमानतळ, रॉकेट-तळ वगैरेंवर– होतील, ह्या समजुतीवर आतां भर देण्यांत आला आहे. संरक्षणाच्या परिभाषेंत ह्याला ‘ counter-force strategy असें नांव आहे.

आतां ह्या दोन समजुती बरोबर–आणि जितक्या प्रमाणांत बरोबर असतील,–कारण शेवटीं सर्व प्रश्न निव्वळ प्रमाणाचाच आहे तर त्यांपैकीं आण्विक युद्धाच्या सुतराम् अशक्यतेच्या दृष्टिकोनाबद्दल गंभीर शंका घेतली गेली आहे, हें तर स्पष्टच आहे. आण्विक युद्धांत कोणताहि एक पक्ष प्रतिपक्षाचा समग्र आण्विक संचय ( प्रत्यक्ष शस्त्रास्त्रें नव्हेत, कारण तीं भूमिगर्भांत सांठवून ठेवतां येतात; मी वाहतुकीच्या साधनांचा उल्लेख करीत आहे ) नष्ट करूं शकतो; पहिल्याच हल्ल्यानें एक पक्ष शत्रुपक्षाच्या वाहतुकीच्या साधनांचा नाश करूं शकतो; स्वतः संपूर्ण सुरक्षित राहून, दुसरा उलट उत्तर देऊं शकणार नाहीं, इतक्या परिणामकारकतेनें हातांतील अस्त्र तो फेंकूं शकतो;– हें जर, आणि आतां ह्या ‘ जर ’– वर जोर देत आहे, खरें असेल, तर इतर परिस्थिति समान मानून, आण्विक युद्धांतील आत्मगत असंभाव्यता पुष्कळशी कमी होते. कारण अशा परिस्थितींत, प्रथम हल्ला करण्याचें, व म्हणूनच स्वतःला संपूर्ण सुरक्षित ठेवण्याचें प्रलोभन अतिशय मोठें असेल, हें उघडच आहे. मात्र हें निव्वळ त्या गृहितकृत्याच्या आधारावरच शक्य आहे.

इतकी सर्वनाशाची परिस्थिति खरोखरच ओढविण्याची शक्यता आहे काय, ह्या प्रश्नाचा विचार करण्यापूर्वीं, रशियांतहि हाच दृष्टिकोन घेणारा विचारप्रवाह अस्तित्वांत आहे, ह्या वस्तुस्थितीला तोंड दिलें पाहिजे. ह्या बाबतींतील रशियन लष्करी तत्त्वाचा विकास चमत्कारिक रीत्या झाला आहे. सरळ १९५५ पर्यंत रशियन लष्करी मत आण्विक अस्त्रांचें महत्त्व जवळ जवळ संपूर्णपणें अमान्य करत होतें. रशियन युद्धविचारांचें मुखपत्र असलेल्या Military Thought ह्या नियतकालिकाच्या फेब्रुवारी १९५५ च्या अंकांत टँक-मार्शल रोट्मिस्ट्रोव्ह् यांचा एक लेख आला व उलटी दिशा मिळाली. ‘ अचानक हल्ला ’ महत्त्वाचा आहे कीं नाहीं, या समस्येच्या सांच्यांत हा लेख टाकला होता, तें राजकीय कारणांकरितां. परंतु आण्विक अस्त्रांनीं केलेला अचानक हल्लाच आपल्या मनांत आहे, ही गोष्ट लेखाच्या शेवटीं रोट्मिस्ट्रोव्हनें स्पष्ट केली. आणि उष्णताप्रधान आण्विकास्त्रांनीं केलेला हल्ला महत्त्वाचा आहे एवढेंच निव्वळ नव्हे, तर तो निर्णायकहि असूं शकेल, अशा आश्चर्यकारक निर्णयाप्रत तो पोहोंचला. नंतर अनेक शब्दांचें अवडंबर माजवून त्यानें असें प्रतिपादन केलें, कीं पश्चिमेकडून होणाऱ्या अशा हल्ल्यापासून आत्मरक्षण करण्याचा एकमात्र उपाय म्हणून रशियाला ‘ pre-emptive strike ’ चा अवलंब करावा लागेल. ह्याचा अर्थ असा, कीं आपल्यावर हल्ला होईल असें वाटतांच रशियानें आधींच हल्ला चढवावा. आतां, मी ज्याला ‘ fastest gun ’ चें तत्त्व म्हटलें, तेंच अधिक खुलसेवार म्हणायचें तर ‘ pre-emptive strike ’ चें तत्त्व म्हणतां येईल. आणि तत्कालीन तांत्रिक परिस्थितीनें कोणत्याहि एका व दोन्ही पक्षांना ह्या तत्त्वांचा अवलंब करणें भाग पाडलें, तर आपल्यापैकीं कोणालाच विशेष संधी असणार नाही.

ह्या तत्त्वाबरोबर जें नंतर रशियाचें लष्करी तत्त्व बनलें ( कारण Military thought नें संपादकी-










यानें रोट्मिम्ट्रोव्हला पाठिंबा दिला होता), दोन टिपणें जोडणें, माझ्या दृष्टीनें महत्त्वाचें व उचित आहे. प्रथमतः हें तत्त्व कोठून उद्भवलें ? तें अमेरिकेच्या स्ट्रॅटेजिक विमानदलाकडून आलें, असें म्हटलें तर तें बहुधा बरोबरच ठरेल. विशिष्ट परिस्थितींत आवश्यकतेचें तत्त्व pre-emptive strike चें तत्त्व प्रथमतः ॲटलांटिक महासागराच्या अमेरिकन किनाऱ्यावरच उद्भवलें. गेल्या वर्षी १४-१५ जानेवारीला क्रुश्चोव्हनें केलेल्या दीर्घ भाषणांत त्यानें आण्विक अस्त्रें अतिशय महत्त्वाचीं असल्याचा दृष्टिकोनच-डंकन सँडीजूपेक्षांहि मोकळेपणानें घेतला होता, ही दुसरी गोष्ट. त्याच वेळीं तो स्पष्टपणें असेंहि म्हणाला कीं, pre-emptive strike चें तत्त्व बाळगण्याची रशियाला आवश्यकता आहे, अशी परिस्थिति आतां आहेसें वाटत नाहीं. रशियाजवळ विरोध करण्याचें सामर्थ्य, भूमि लपविण्याचें व इतर सामर्थ्य इतकें आहे कीं, प्रतिहल्ला करण्याकरतां पुरेसें सामर्थ्य सदैवच त्याच्याजवळ असेल. म्हणून Military Thonght मध्यें आलेलें रोट्मिस्ट्रोव्हचें तत्त्व अमेरिकेपेक्षां रशियांत अधिक वादातीत ठरलें आहे, असें म्हणणें अगदींच चुकीचें ठरेल. मात्र दोन्ही देशांतील महत्त्वाच्या वर्तुळांत त्याचा प्रसार झाला आहे, हें तितकेंच निश्चित आहे.

आतां आपण ह्या चर्चेतील सर्वांत महत्त्वाच्या प्रश्नापाशीं येऊन ठेपलों आहोंतः प्रथम, अचानक हल्ला करणाऱ्याला अनन्वित लाभ होईल, अशी आण्विक युद्धमोहिमेची तांत्रिक परिस्थिति आज घटकेला खरोखरच आहे काय ? मला समजत नाहीं, कीं ह्या प्रश्नाला उत्तर देण्याचा अधिकार सामान्य माणूस कसा सांगू शकेल. प्रचलित लिखाणानें माझी तशी समजूत करून दिली आहे, एवढेंच फक्त मी सांगू शकेन. प्रथम हल्ला केल्यामुळें आज मिळणारें फायद्याचें प्रमाण, वा तो आजपासून पांच वर्षांनीं केल्यास मिळणारें फायद्याचें प्रमाण ठरविणें कठीण असलें (या बाबतींत लोक नेहमींच भविष्यकालीन घटना जमेस धरत आहेत. नजिकच्या भविष्यकाळांत घडून येतील असें वाटणाऱ्या तांत्रिक विकासाची सूट ते हिशेबांत धरत आहेत), तरी प्रथम हल्ल्यामुळें होणाऱ्या लाभाचें प्रमाण भयंकर वाढत आहे, हें अमान्य करणें कठीण आहे.

आतां हा लाभ प्रत्येक पक्षाच्या संरक्षण-तळांच्या अवस्थेवर-त्यांच्यावर हल्ला होऊं शकतो किंवा नाहीं, ह्या अवस्थेवर-अवलंबून आहे. अगदीं एका टोकाला गेलें तर wohlstetter च्या म्हणण्याप्रमाणें, एका पक्षाचे रॉकेट- व विमानतळ जर दुसऱ्याकडून शंभर टक्के हल्ला होऊं शकण्याजोगे असतील तर होणारा लाभ शंभर टक्के असेल. उलटपक्षीं एका वा दोन्हीं बाजूंचे संरक्षण-रॉकेट-विमानतळ वगैरे जर दुसऱ्याच्या मतें शंभर टक्के हल्ला करण्याजोगे असतील, तर पहिल्या हल्ल्यापासून कोणालाच कांहींच लाभ होणार नाहीं. कारण प्रतिहल्ल्याचें सामर्थ्य शाबूत असेल. अर्थात्, आतां, प्रस्तुत परिस्थितींत हीं दोन्ही टोकें गैरलागू आहेत. हल्ला होऊं शकेल, याचें प्रमाण किती आहे, ह्या प्रश्नाचें उत्तर देण्याचें सामर्थ्य सामान्य माणसांत नाहीं. कारण तज्ज्ञांतहि ह्याबद्दल अद्याप मतभेद आहेत. परंतु ज्याअर्थी हल्ला होऊं शकेल कीं नाहीं, हा प्रश्न निघालाच आहे, त्याअर्थी आपली संरक्षण सामग्री संरक्षित करण्याचें महत्त्व अतिरिक्तपणें वाढतें, असें मात्र सामान्य माणूस म्हणूं शकेल. येत्या कांहीं दशकांत आपल्या सर्वांचीच वाफ होण्याची शक्यता आहे किंवा काय, ह्या प्रश्नाचें उत्तर निव्वळ ह्या एकाच मुद्द्यावर असावें, हें मात्र समस्येचें अवास्तव सहजीकरण झालें, असेंच मला वाटत आहे. पश्चिमी राष्ट्र आपलें सामर्थ्य किती प्रमाणांत प्रहार-सुरक्षित करूं शकतें वा प्रत्यक्ष करूं शकेल, यावर जिवंत राहण्याची आपल्याला मिळणारी संधि अवलंबून आहे. कारण पश्चिमी राष्ट्रांशीं आपला संबंध आहे : रशियांत काय घडतें, त्यावर आपण अतिशयच अप्रत्यक्षपणें प्रभाव पाडूं शकतो; परंतु आपल्या लष्करी बाबींत रशियन लोक सर्वांगीण विचार करणारे असतील, ह्याबाबत आपण शंका बाळगण्याचें कारण नाहीं. पश्चिमी प्रतिबंधक उपायांच्या संख्येपेक्षां हल्ल्यापासूनची सुरक्षितता ही गोष्ट मला अधिक महत्त्वाची वाटते. ह्या संख्येलाहि महत्त्व अर्थातच आहे; कारण सुरक्षिततेचें प्रमाण - बऱ्याच नाहीं, तरी कांहीं अंशीं - ह्या संख्येवर अवलंबून आहे. कोणकोणत्या राष्ट्रांजवळ प्रतिबंधक सामग्री आहे, ह्या प्रश्नापेक्षां, किंवा सध्या आमच्या राजकीय पक्षानें ज्या प्रश्नांवर आपलें डोकें शिणवलें आहे -खास ब्रिटिश प्रतिबंधकात्मक असें कांहीं



अनुक्रमणिका






असावें कीं काय (म्हणजे नेमकें काय कोण जाणें),-त्या प्रश्नांपेक्षां हल्ला होऊंच शकणार नाहीं अशी अवस्था संपादन करणें हें महत्त्वाचें आहे. पश्चिमी प्रतिबंध-काच्या स्वरूपापुढें असे प्रश्न महत्त्वदृष्ट्या अगदीं ठेंगणे आहेत, असें मात्र वाटतें. आणि प्रतिबंधकाच्या स्वरूपाचा माझा अर्थ म्हणजेच हल्ला होऊं शकण्याचें वा न होऊं शकण्याचें प्रमाण.

## जॉड्रेल बॅंक येथील रेडिओ-दुर्बीण

मॅंचेस्टर विद्यापीठानें जॉड्रेल बॅंक येथें जगांतील पहिली प्रचंड रेडिओ-दुर्बीण उभारली व खगोल-शास्त्राच्या अभ्यासाचें एक दालन खुलें केलें. अनेक अडचणींतून मार्ग काढत ही विराट् योजना यशस्वी करण्याच प्रधान श्रेय १९४१ ते ५७ पर्यंत मॅंचेस्टर विद्यापीठाच्या कौन्सिलचे चेअरमन लॉर्ड सायमन् ह्यांना आहे. त्यांनींच मृत्यूपूर्वी लिहिलेला दुर्बिणीच्या योजनेची माहिती देणारा Universities Quarterly च्या डिसेंबर १९६० च्या अंकांतील हा लेख आपल्याकडील विद्यापीठीय यंत्रणेस उद्बोधक वाटेल.

ऑक्टोबर १९५७ रशियानें पहिला स्फुट्निक अंतराळांत सोडला. त्याच वेळेस मॅंचेस्टर विद्यापीठानें आपली जॉड्रेल बॅंक येथील रेडिओ-दुर्बीण कार्यकारी केली.

दहा वर्षांपूर्वी विद्यापीठाच्या कौन्सिलनें एक रेडिओ-दुर्बीण बांधण्याचा निर्णय घेतला. कित्येक अड-चणी समोर उभ्या ठाकल्या, परंतु विद्यापीठाचा आपल्या लोकांवर खंबीर विश्वास होता. ह्या रेडिओ-दुर्बिणीशीं तुलना करतां येईल अशी एकहि दुर्बीण आज जगांत उपलब्ध नाहीं. ह्या दुर्बिणीच्या निम्म्या व्यासाची रेडिओ-दुर्बीण अमेरिकेंत आतां बांधली जात आहे. तिला खर्च तिप्पट येईल व ती १९६२ सालीं तयार होईल. जवळजवळ अडीचपट व्यासाची आणखी एक दुर्बीणहि अमेरिकेंतच बांधली जात असून ती १९६४ सालीं तयार होईल व तिला सत्तर पटींनीं खर्च येईल.

तीनशे वर्षांपूर्वी क्रांतीशीं तुलना होऊं शकेल अशी क्रांति खगोलशास्त्रांत गेल्या कांहीं वर्षांत झालेली आहे, असें कित्येकांचें मत आहे. एका लहानशा दुर्बिणीनें ग्रह–नक्षत्रांचें निरीक्षण करून गॅलिलिओनें विकासाची दिशा दाखवून दिली व त्या दिशेनें झालेल्या प्रगतीची परिणति म्हणजे विसाव्या शतकांत अमेरिकेनें बांधलेल्या प्रचंड दुर्बिणी. ह्या न शतकांत माणसाचें विश्वाविषयींच ज्ञान नित्य वाढतच गेलें आहे, आणि त्यामुळें निरी-क्षणाचें संपूर्णतया नवें साधन विश्वाविषयींच्या आपल्या ज्ञानांत मौलिक भर टाकेल, अशी शक्यता निर्माण झाली. बाह्य अवकाशांतून पृथ्वीवर रेडिओ-लहरी येत असल्याचा शोध १९३१ सालीं एका अमेरिकन तंत्र-कारानें लावला. दुसऱ्या महायुद्धानें ह्या बाबतींत विशेष प्रेरणा मिळाली व अधिक संशोधनाला तांत्रिक साधनें पुर-वलीं. विश्वसंशोधनाच्या क्षेत्रांत एक नवीनच दालन खुलें झालें आहे व ह्या संशोधनाला लागणारी यंत्रसामग्री optical खगोलशास्त्रांतील यंत्रसामग्रीशीं मिळती-जुळती असेल, असेंहि लौकरच प्रत्ययास आलें. रेडिओ–लहरींची लांबी प्रकाश–लहरींच्या लांबीपेक्षां लक्षावधि पटींनीं अधिक असल्यानें स्वाभाविकच रेडिओ–दुर्बिणी साध्या दुर्बिणींपेक्षां आकारानें मोठ्या असाव्या लागतात. रेडिओ–दुर्बिणीनें स्पष्ट केलेले कांहीं आकार दृश्य विश्वाच्या ग्रहनक्षत्रांच्या आका-राशीं जुळत असले, तरी कित्येक आकृत्यांना दृश्य विश्वांत कांहींच सादृश्य मिळत नाहीं; याचें कारण असें, कीं साध्या दुर्बिणीच्या पलीकडच्या प्रांतांत नजर नेण्याची क्षमता रेडिओ–दुर्बिणींत आहे व त्यामुळें लाखों–कोट्यवधि वर्षांपूर्वी विश्वरचना कशी असेल, ह्याचें चित्र आपल्यापुढें उभें राहतें.

तीन वर्षांच्या क्रियाशील काळांत, ह्या दुर्बिणीनें आपला ९० टक्के वेळ विश्वाच्या निरीक्षणाकरितां खर्च केला आहे. हेंच ह्या दुर्बिणीचें सर्वांत महत्त्वाचें कार्य असलें, तरी वृत्तपत्रांना रस वाटावा असें हें कार्य नाहीं. त्यामुळें लोकांना त्याबद्दल अतिशय थोडी माहिती आहे.

प्रचंड साध्या दुर्बिणीप्रमाणेंच विश्वाविषयींची जिज्ञासा हेंच रेडिओ–दुर्बिणीच्या विकासामागचें कारण होतें. युद्धाआधीं मॅंचेस्टर विद्यापीठांत बर्नार्ड लोवेल् ह्या तरुण वैज्ञानिकाची नेमणूक झाली. युद्ध-काळांत शास्त्रज्ञांच्या एका गटांत मॅल्व्हर्न येथें रेडि-ओच्या विकासाविषयीं संशोधन केल्यानंतर, रेडिओ–दुर्बिणींचें अफाट ज्ञान व अदम्य उत्साह घेऊन युद्ध संपल्यावर तो मॅंचेस्टरला परतला. मॅल्व्हर्नहून कांहीं

उपकरणें मिळवून, तीं त्यानें विद्यापीठांत बसविलीं. परंतु विद्युत्-लहरींच्या प्रतिकूल परिस्थितीमुळें उपयुक्त निष्कर्ष निघणें अशक्य होऊन बसलें. चेशायर् परगण्याच्या ग्रामीण भागांत जॉड्रेल बँक येथें विद्यापीठाच्या वनस्पति-शास्त्राच्या विभागाची १० एकर जमीन होती. तेथें आपलीं उपकरणें उभारण्याची परवानगी लोवेलला मिळाली. ह्या भागांत विद्युत्लहरींचा त्रास मुळींच नव्हता, असें आढळून आलें व प्रयोगांतून यशस्वी निष्कर्ष मिळाले. ह्यामुळें प्रभावित होऊन विद्यापीठानें सभोंवतालची आणखी जमीन खरेदी करून तेथें इमारती व प्रयोग-शाळा उभारण्याचें काम विज्ञान-विभागावर सोंपवलें.

लोवेल् आणि त्याच्या सहकाऱ्यांनीं पार पाडलेली पहिली महत्त्वाची कामगिरी, म्हणजे सरकारी अनुदानाच्या साहाय्यानें त्यांनीं आपल्या हातांनीं २२० फूट व्यास असलेली स्थिर रेडिओ दुर्बीण बांधली. ह्यांतून मिळालेले परिणाम इतके निश्चित स्वरूपाचे होते, कीं दृश्य आकाशांतील कोणत्याहि भागाचीं छायाचित्रें घेतां येतील अशी प्रचंड हालती २५० फुटी रेडिओ दुर्बीण बांधायलाच हवी, असा निर्णय लोवेलनें घेतला. विद्यापीठ, विद्यापीठाच्या विज्ञानविभागाचे प्रमुख, प्रा. ब्लॅकेट्, सरकारी शिक्षणखातें व रॉयल ॲस्ट्रॉनॉमिकल् सोसायटीचें काउन्सिल् या सर्वांनींच ह्या प्रस्तावाला दुजोरा दिला. सर्व सत्ताधारी मंडळी कालांतरानें अनुकूल झाली, तरी अफाट खर्चामुळें ( त्यावेळचा खर्चाचा अंदाज पंचवीस हजार पौंडांचा होता ) लहान दुर्बिणीवरच समाधान मानावें, असें दडपण आणलें गेलें. लोवेलनें जवळजवळ एकाकीपणें असें करण्याचें नाकारलें.

ह्या सुमारास २५० फुटी हालत्या दुर्बिणीचें तांत्रिक रेखाटन तयार करून घेण्याकरतां म्हणून शिक्षणखात्याकडून विद्यापीठाला तीन हजार पौंडांचें अनुदान मिळालें. असें रेखाटन करून देणारा कोणी सांपडेना, प्रत्येकालाच हें काम अतिशय कठीण वाटत होतें. शेवटीं H. C. Husband & Co नें हें काम स्वीकारलें; त्यांचें रेखाटन स्वीकृतहि झालें. आतां ही दुर्बीण बांधायला चार लक्ष पौंड खर्च येईल, असा अंदाज बऱ्याच लांबलचक चर्चेनंतर व्यक्त करण्यांत आला. ह्यांतील निम्मे सरकारनें दिले व निम्मे नफील्ड फौंडेशननें दिले.

कोणत्याहि नव्या तांत्रिक रेखाटनाची गत जशी होते, तसेंच येथेंहि झालें. बांधणीच्या प्राथमिक कामाची गति अपेक्षेपेक्षां फारच मंद होती. यंत्रसामग्रीचे कांहीं भाग मिळणें अतिशय कठीण होतें, त्यामुळें काम सुरू झाल्यावर विद्यापीठाला वाढत्या खर्चाची जाणीव झाली. सामग्रीच्या व रोजगाराच्या वाढत्या किंमतीमुळें मूळच्या अंदाजांत शंभर टक्के वाढ होणार, हें स्पष्ट दिसूं लागलें.

सरकारनें व विद्यापीठानें मिळून ह्या वाढत्या खर्चाचें कारण व एकंदर खर्चाचा निश्चित अंदाज शोधून काढण्याकरतां एक चौकशी समिति नेमली. ह्या चौकशींतून असें निष्पन्न झालें, कीं ही दुर्बीण लाखमोलाची ठरण्याची शक्यता आहे, तेव्हां राष्ट्रीय हिताच्या दृष्टीनें ही योजना पूर्ण झालीच पाहिजे; शिवाय कार्यवाहींत कांहीं दुबळेपणा आढळून आला आहे, तो जरी ह्या विराट् योजनेच्या निखळ नाविन्यामुळें आला असला, तरी विद्यापीठानें तो तात्काळ दूर करणें अत्यावश्यक आहे.

कंत्राटदारांच्या सहकार्यानें लोवेल् आणि हजबंड् यांच्या नेतृत्वाखालीं काम करणाऱ्या सबंध गटानें एव्हांना बहुसंख्य अडचणींवर मात मिळवली होती. नंतरची प्रगति झपाट्यानें होत गेली व १९५७ च्या ऑक्टोबरमध्यें दुर्बीण तयार झाली.

आत्तांपर्यंत ह्या दुर्बिणीनें राडारच्या साहाय्यानें रशियन स्पुट्निक्स्, व ल्युनिक्स तसेंच अमेरिकन बालग्रह यांचा मागोवा घेतला आहे. जॉड्रेलची दुर्बीण ही संपूर्णतया हालती अशी जगांतील एकमेव मोठी दुर्बीण आहे.

## क्युबांतील क्रांति आणि हवाना विद्यापीठ

क्यूबामध्यें क्रांति घडून आली व फिडेल कॅस्ट्रो सर्वप्रमुख बनला, ह्या घटनेला अनेक अंगें आहेत. परंतु ह्या सर्व स्थित्यंतरांत हवाना विद्यापीठांसारख्या मातब्बर शिक्षणसंस्थेला कोणकोणत्या अवस्थांतून जावें लागलें व शेवटीं त्याची कशांत परिणति झाली, ह्याचें चाक्षुष वर्णन हवाना विद्यापीठांत पूर्वी तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक असलेले, व आतां हद्दपार होऊन

Puerto Rico विद्यापीठांत असलेले श्री. पेद्रो व्हिन्सेंट आजा यांनीं Committee on Science & Freedom तर्फे प्रकाशित होणाऱ्या Science & Freedom ह्या परिपत्रकाच्या अठरा क्रमांकाच्या संकलनांतील एका लेखांत केलें आहे.

क्यूबा एक स्पॅनिश वसाहत असतांनाच हवाना विद्यापीठाची स्थापना झाली. पोपच्या आदेशानें सुरू झालेल्या ह्या विद्यापीठानें कॅरिबिअन् विभागांत खिस्ति व पाश्चिमात्य संस्कृतीचा प्रसार करावा, अशा हेतूनें त्याची आखणी करण्यांत आली. प्रथमपासूनच तें एक उच्चतर अभ्यासाचें केंद्र बनलें. निव्वळ उपयुक्ततावादी व शास्त्रीय शिक्षणापेक्षां त्याची व्याप्ति आरंभापासूनच अधिक होती. त्यामुळें प्रेरित झालेलीं सांस्कृतिक मूल्यें आजहि क्यूबांत प्रभावी राहिलेलीं आहेत.

१८ व्या शतकांत पाश्चिमात्य देशांतील दार्शनिक तत्त्वें आणि सामाजिक व राजकीय रचनांत अतिशय क्रांति घडून आली; स्पॅनिश अमेरिका - विशेषतः तेथील विद्यापीठें – ह्या प्रभावांतून सुटलीं नाहीं. लॅटिन अमेरिकन शहरांतील बुद्धिमंतांत बिनीवर असलेल्या लोकांत राजकीय लोकशाहीच्या ध्येयानें मूळ धरलें आणि तेथून पसरत-पसरत हें ध्येय सर्व जनतेच्या मनांत रुजलें. वसाहतवादी राजकीय यंत्रणेकडून विरोध झाला, तरीसुद्धां लोकशाहीवादी उदारमतवादी तत्त्वज्ञानानें आपलें प्रस्थ वाढवलेंच.

चर्च, शासनसंस्था व मुद्रणसंस्था या समाजाच्या तीन शक्तिकेंद्राहून स्वतंत्रपणें एक बौद्धिक शक्ति म्हणून विद्यापीठानें ज्या तत्त्वांच्या व आदर्शांच्या आधारें कार्य करायचें, त्यांच्या वाढीस पोषक असें वातावरणहि प्रत्यक्ष विद्यापीठांतच होतें. हीं तीन मूलभूत तत्त्वें अशीं सांगतां येतील : (१) सत्यशोधनाला अवांतर वा विरोधी अशा प्रभावांपासून सुरक्षित होऊन संस्थेचें शास्त्रीय संशोधन व शैक्षणिक कार्य चालावें, याकरतां आवश्यक असलेला बौद्धिक बंदिस्तपणा, – म्हणजेच विद्यापीठाची स्वायत्तता; (२) बौद्धिक क्षेत्रांतील कामगिऱ्यांबद्दल आदर; (३) विद्यार्थी हाच शिक्षणाचा सर्वांत प्रधान विषय आहे, ह्याची स्वीकृति, व विद्यार्थ्याला आपले विषय निवडण्याची पूर्ण मुभा. ह्या तत्त्वांमधून मानवी स्वातंत्र्याचा आदर्श साकार करणें ही विद्यापीठाच्या कर्तव्यामागची प्रेरणा होती.

वेगवेगळीं संविधानें असलेलीं राजकीय दृष्ट्या स्वतंत्र व सार्वभौम राज्यें स्थापन करणें, हेंच प्रमुख ध्येय त्याकाळीं स्पॅनिश अमेरिकन देशांपुढें होतें. अशा वेळीं, देशांतल्या शासनयंत्रणेशीं जनतेच्या आकांक्षाचा संघर्ष चालू असतांनाच विद्यापीठांचा कायापालट घडवून आणला जात होता आणि हवाना विद्यापीठानेंहि, वैचारिक क्षेत्रांतील मान्यवर अग्रण्यांच्या मार्गदर्शनाखालीं शैक्षणिक तत्त्वज्ञान, शिक्षणपद्धति व व्यवस्थापनांत सुधारणा घडवून आणल्या.

२० मे १९०२ क्यूबा जाहीरपणें प्रजासत्ताक बनलें. विद्यापीठांत अनेक नव्या सुधारणा घडून आल्या. उथळ व्यवहारवाद आणि क्यूबाच्या राष्ट्रीय जीवनाच्या सर्व अंगांत आत्मिकतेचा अभाव, हा ह्या सुधारणेच्या कार्यक्रमाचा वारसा होता. ह्या positivist दृष्टिकोनानें केवळ हवाना विद्यापीठाचेंच नव्हे, तर क्यूबांतील सबंध शैक्षणिक व्यवस्थेचेंच सुकाणूं आपल्या हातीं घेतलें होतें.

क्यूबाच्या ह्या सर्वांत महत्त्वाच्या केंद्रांत व एकंदरीनें सबंध देशांतच नव्या सुधारणा घडून यायला हव्यात, अशी निकड परत विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकांतील पिढीला जाणवली. राष्ट्रीय व्यवहार ज्या नैतिक व राजकीय बेमुर्वतीनें केले जात होते, त्यामुळें सबंध क्युबांतले विचारवंत खवळून उठले. दक्षिण अमेरिकेंतील, व विशेषतः आर्जेंटिनांतील, विद्यापीठीय सुधारणाहि क्यूबांत जाणवल्या होत्या.

जगाच्या चेहेरेपालट करण्याकरतां सुचविल्या गेलेल्या वेगवेगळ्या नव्या कल्पना व योजनाहि याच सुमारास क्यूबांत पोंचल्या. सामाजिक जाणिवेला एक नवेंच वळण लागलें. ह्या सामाजिक रुपांतरांतून निर्माण झालेल्या समस्यांना तोंड देण्यांत विद्यापीठाच्या विवेकबुद्धीनें प्रत्यक्षतः अतिशय महत्वाची कामगिरी बजावली. आपल्या उदारमतवादी आदर्शाचें आर्थिक क्षेत्रांतील संप्रसारण म्हणून तत्कालीन विद्यापीठीय पिढीनें लोकशाहीच्या कल्पनांच्या व्यापक चौकटींत समाजवादी मतवाद सामावून घेतला. अशा रीतीनें, मागील सर्व क्रांतिकारक पिढ्यांप्रमाणेंच, याहि वेळीं व्यक्तिमात्राविषयींच्या निस्सीम आदरांतून अंकुरित होणाऱ्या प्रजासत्ताकाच्या प्रतिष्ठा त्यांच्या मूलभूत राजकीय तत्त्वप्रणालीशीं इमान राखलें गेलें. शिवाय ह्या पिढीनें संस्थांच्या खऱ्याखुऱ्या






स्वायत्ततेची मागणी केली. ही स्वायत्तता परत एक स्थिर सिद्धि म्हणून नव्हे, तर इच्छित बदल घडवून आणण्याचें अनिवार्य साधन म्हणून होती. लोकशाहींतल्या दोषांचें निराकरण अधिक लोकशाहीनेंच करतां येतें, अशी त्यांची श्रद्धा होती.

हवाना विद्यापीठापुरतें, स्वायत्तता मिळविणें हें निकडीचें ध्येय होतें. शेवटीं १९३७ सालीं हें इच्छित सिद्ध झालें, आणि १९४० सालीं बनवलेल्या घटनेच्या ५२ क्रमांकाच्या विधेयकानें ह्यावर शिक्कामोर्तब केलें. ही स्वतंत्रता मिळवल्यानंतर विद्यापीठानें स्वतःच्या शासन-यंत्रणेची स्थापना केली; डोळ्यांत तेल घालून केलेली स्वतंत्रतेची जपणूक हें ह्या पद्धतीचें वैशिष्टय होतें. विषय-निवडीचें स्वातंत्र्य, शैक्षणिक स्वातंत्र्य, धार्मिक दार्शनिक-राजकीय अभिव्यक्तीचें स्वातंत्र्य, शिक्षक व विद्यार्थी दोघांनाहि संघटना-स्वातंत्र्य,-अशा सर्व स्वातंत्र्याची हमी देण्यात आली. सर्व यंत्रणा लोकशाही पद्धतीनेंच चालवली जाईल, अशी निश्चिती विद्यापीठाच्या घटनेनें दिली. ह्याच आराखड्यावर विद्यार्थ्यांनीं आपली संघटना उभारली. असें होतां-होतां विद्यार्थ्यांची संख्या तीस हजारापर्यंत गेली. विद्यापीठांत अंतर्गत संघर्ष होतेच, नव्या-जुन्याचा संघर्ष होताच. परंतु तरी, एकंदरीनें प्रजासत्ताकाच्या जन्मवेळीं असलेल्या उपयुक्ततावादी, धंदेवाईक वृत्तीनें विद्यापीठाला ग्रासलेलें होतेंच.

१० मार्च १९५२ स्वातंत्र्याचीं सर्व तत्त्वें धुडकावून बॅटिस्टानें परत एकदां सत्ता काबीज केली. आणि त्याला पहिला विरोध हवाना विद्यापीठानें केला. परत एकदां क्यूबा हें राष्ट्र क्रांतीच्या वावटळींत सांपडलें. परत एकदां राष्ट्राची इच्छाशक्ति लोकशाही जीवन-पद्धतीच्या पुनःप्रस्थापनेकडे व अंमलबजावणीकडे वळली. ही अत्याचारी राजवट उलथून लावल्यावर १९४० चें संविधान परत पुरेपूर कार्यकारी केलें जावें ह्यावर सर्व क्रांतिकारक व नागरी नेत्यांचें एकमत झालें.

क्रांति यशस्वी झाल्यावर १९४० सालच्या संविधान फिडेल कॅस्त्रोनें जाहीरपणें स्वीकृत केलें, दीड वर्षाच्या काळांत देशव्यापी खुल्या निवडणुकी घेण्याचें अभिवचन दिलें. अत्याचाराच्या काळांत विद्यापीठानें जी ठाम व खंबीर भूमिका घेतली होती, तिचीहि दखल त्यानें घेतली व विद्यापीठाची स्वायत्तता जतन करण्याचा शब्द दिला. विद्यापीठाच्या अंतर्गत विकासास कारणीभूत झालेल्या स्वतंत्रतायुक्त तत्त्वांची पुनःप्रतिष्ठा करण्याचें, शैक्षणिक सुधारणेला हातभार लावण्याचें, विद्यापीठीय शिक्षणाकरतां आर्थिक अनुदान वाढविण्याचें व नियोजित 'विद्यापीठ नगरी' ची रचना करण्याचें त्यानें कबूल केलें.

प्रारंभीं क्रांतीच्या नेत्यांच्या प्रामाणिकपणावर संपूर्ण विश्वास ठेवला गेला. ह्या विश्वासाचें द्योतक म्हणून विद्यापीठाच्या कायदेशीर समित्यांनीं मंत्रिमंडळाला एक कायदा पास करण्याची विनंति केली. ह्या कायद्यान्वयें विद्यार्थी व प्राध्यापक यांची संमिश्र समिति शैक्षणिक सुधारणांचा कार्यक्रम आंखणार होती. ह्या खेरीज प्रत्येक faculty च्या नियामक समितींत व विद्यापीठाच्या उच्च कौन्सिलमध्यें विद्यार्थ्यांना प्रतिनिधित्व देऊन, विद्यापीठानें आपला लोकशाहीवरील विश्वास व्यक्त केला.

परंतु क्रांतिकारकांच्या नेतृत्वांतील आंतल्या गटाचे अंतःस्थ हेतु निर्देशित करणारीं कित्येक लक्षणें लौकरच दृष्टोत्पत्तीस आलीं. राजकीय वातावरण बदलूं लागलें. लाल होऊं लागलें, आणि उदारमतवादी व्यक्तींवर चढाई होऊं लागली. कॅस्त्रोच्या प्रवक्त्यांकडून अशा हालचालींना प्रोत्साहन दिल्यामुळें परिस्थिति अधिकच गंभीर झाली. ह्या बरोबरच लोकशाहीविरोधी प्रचार कानावर येऊं लागला. आधार म्हणून सर्व सर्वंकष राजवटींनीं वापरलेलीं शून्यवादी फसवीं विधानें पुढें करण्यांत आलीं. कॅस्त्रोच्या टांकसाळींत 'निवडणुका कशाकरतां ?' ही घोषणा पाडण्यांत आली,-येथवर मजल गेली.

कमांडर रोलांडो क्युबेलाच्या नेतृत्वाखालीं गणवेशधारी सैनिकांनीं डाव्यांच्या साहाय्यानें विद्यापीठीय विद्यार्थ्यांची संघटना काबीज केली. फिडेल आणि राउल कॅस्त्रो यांनीं व्यक्तिशः दडपण आणून क्युबेलाला ह्या संघटनेचा अध्यक्ष म्हणून विनाविरोध निवडून आणलें. ह्या लादणुकीबरोबरच नैतिक व मानसिक दडपशाही आली आणि पिस्तुलांचें प्रदर्शन केलें गेलें.

नंतर विद्यार्थ्यांच्या लष्करी पलटणी बनवून विद्यापीठाचें लष्करीकरण करण्यांत आलें. क्यूबाला परकीय










आक्रमणापासून भीति आहे, अशी सरकारी सबब असली, तरी मुख्यतः लोकशाही विरोधी गटांतून भरती झालेल्या ह्या पलटणींकडून विद्यार्थ्यांतील व प्राध्यापकांतील मत व क्रिया-स्वातंत्र्य दडपण्याचेंच काम करून घेण्यांत आलें. आणि १९६० च्या आरंभीं, विद्यापीठांत राजवटीची सत्ता जवळजवळ निरंकुशपणें गाजवली जात असतांच, विद्यापीठाच्या स्वायत्ततेमुळे प्रतिक्रांतिवादी उद्दिष्टांची भर होत आहे, असें सांगण्यांत येऊन ह्या स्वायत्ततेचा नव्यानें अर्थ लावण्यांत आला पाहिजे, असा दृष्टिकोन मांडण्यांत आला. सरकारचें धोरण व त्याची घडण झपाट्यानें बदलत होती, लोकशाहीकडे कल असलेल्या उरल्या-सुरल्या मंत्र्यांना काढून टाकण्यांत आलें, आणि आर्थिक संघटना उभारण्याचें, वृत्तपत्रांच व (कम्युनिस्ट पक्ष सोडून इतर) राजकीय पक्षांचें स्वातंत्र्य चिरडून टाकल्यावर, आतां विद्यापीठाची पाळी आहे, हें उघड झालें. परिस्थिति हळू हळू असह्य झाली. वर्गांत किंवा वर्गाबाहेर व्यक्त करण्यांत कोणत्याहि विसंवादी सुरावर धमक्यांचा मारा होऊं लागला. सरकारी धोरणाच्या बाहेर जाणारीं विद्यार्थ्यांचीं प्रकाशनें संघटित गटांकडून नष्ट केलीं जाऊं लागलीं. कोणताहि कम्युनिस्ट-विरोधी दृष्टिकोन हा 'प्रतिक्रांतिवादी'च आहे, म्हणून कम्युनिस्ट पक्षाचे सभासद आणि पूर्वीच्या स्वतंत्र संस्थांचे सभासद यांना 'Purge' करण्याइतपत मजल राजवटीनें गांठली होती.

१९६० च्या मे महिन्यांत 'che' Guevera या कमांडर, मतवादाचा बांधीव स्मृतिकार आणि क्यूबाच्या राष्ट्रीय बँकेचा अध्यक्ष बनलेल्या पूर्वीच्या डॉक्टरानें विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांपुढें एक व्याख्यान दिलें व सरकारच्या विद्यापीठविषयक धोरणांतील खरे हेतू स्पष्ट झाले. 'हवाना विद्यापीठाच्या इतिहासास आज आरंभ होत आहे.' आज क्यूबांत सर्वंकष राजवट प्रस्थापित करत असलेल्या सरकारचीं उद्दिष्टें, त्याच्या पद्धति, त्याची विशिष्ट तत्त्वप्रणालि यांची सेवा आतां विद्यापीठानें करायची आहे, असें त्यानें सूचित केलें व हेंच तो आतां प्रत्यक्षपणें कार्यवाहींत आणत आहे. त्याचे शब्द अतिशय स्पष्ट व मुद्देसूद होते : 'अद्याप क्रांति विद्यापीठापर्यंत पोंचलेली नाहीं. क्रांतींत विद्यापीठाचा अंतर्भाव शक्य तितक्या लौकर करून घेतला पाहिजे. क्रांतीच्या पद्धती विद्यापीठाला लागू केल्या पाहिजेत.' त्याच्या एका वाक्यानें तर विद्यापीठाच्या मर्मींच आघात केला : व्यक्ति नव्हे, समष्टि महत्त्वाची आहे. कॅस्ट्रोच्या सिद्धांताप्रमाणें विद्यार्थ्याला निव्वळ साधनमूल्य आहे : त्यानें कशाचा अभ्यास करावा, विचार करावा, कोणतीं मतें व्यक्त करावींत, त्याचें कर्तव्य काय–शासनसंस्था त्याला हें सर्व सांगेल.

विद्यार्थ्यांकडून होणाऱ्या निषेधाची शक्यता जरी उरली नसली तरी विद्यापीठावरील सरकारच्या अनिर्बंध नियमनांत अजून एक अडथळा होता. विद्यापीठाच्या faculty द्वारां कार्य करणारी कायदेशीर स्वायत्त यंत्रणा. त्यामुळें faculty ला नमवणें व तिची व्यवस्थाच नष्ट करणें आवश्यक होऊन बसलें. अध्यक्षीय प्रासादांतूनच अपमान व टीका यांचे अडथळे उभे करण्यांत आले. देशभरच्या–नियंत्रित-वृत्तपत्रांकडून धमक्या व हल्ल्यांचा भडिमार झाला. प्रत्यक्ष वर्गांतसुद्धां, आपण चौकशी समितीपुढें उभें आहोंत, असें प्राध्यापकांना वाटूं लागलें; प्रत्येक faculty प्रमुखानें व विद्यापीठाच्या कौन्सिलनें राजिनामे दिले पाहिजेत, अशी मागणी विद्यार्थ्यांच्या संघटनेनें केली. विमानतळावर विद्यापीठांतील एका प्राध्यापकावर व त्याच्या मित्रांवर गोळ्या झाडण्यांत आल्या. ह्या गोळ्या राउल कॅस्ट्रो व रोलांडो क्युबेला यांच्या आज्ञेनें झाडण्यांत आल्या, हें सर्वांनाच माहित होतें. School of Engineering मधील प्रोफेसरांना 'शैक्षणिक कारणांवरून' काढून टाकण्यांत आलें. नंतर लादण्यांत आलेल्या भरतींतील एक जागा, सूचकपणें, एका व्यक्तीला मिळाली; ही व्यक्ति म्हणजे 'che' Guevera चा मेहुणा.

१९६० च्या जुलैमध्यें कांहीं थोडक्या विद्यार्थ्यांनीं व प्राध्यापकांनीं एक सभा भरवून विद्यापीठाची कायदेशीर शासनसंस्था मोडून, तिच्या जागीं Junta Superior नामक सर्वोच्च शासन समितीची स्थापना करण्याचें ठरवलें. ह्या समितीनें विद्यापीठाच्या शासनाचीं सर्व सूत्रें हातीं घेतलीं व प्रथमतः विद्यापीठाला आपला अधिकार स्वीकारायला भाग पाडलें. 'Junta'ला सरकारी मान्यता देणारा कायदा










४ ऑगस्टपासून अंमलांत आला, व Juntaच्या प्रत्येक कृत्याला कायद्याचें महत्त्व आलें. हा कायदा उघडपणें घटनाबाह्य व क्रांतिकारक सरकारनें उद्घोषिलेल्या तत्त्वांशीहि विरोधी आहे. वैद्यक, स्थापत्य, वास्तु व कायदा या चार सर्वांत मोठ्या खात्यांनीं 'Junta' पुढें मान तुकवण्यास नकार दिला व सर्वांनीं संघटितपणें राजीनामा सादर केला. सबंध विद्यापीठांतील चारशेंपैकीं दोनशे प्राध्यापकांनीं राजीनामा दिला. उरलेल्यांपैकीं कांहींनीं व्यक्तिशः राजिनामे दिले, कांहींना सक्तीनें निवृत्त होणें भाग पाडलें, कांहींना निर्वासित केलें गेलें. जे राहिले आहेत, ते भयग्रस्त मूकता पाळतात आणि त्यांतले बहुसंख्य पळून जाण्याकरतां संधि शोधत आहेत. या रिकाम्या जागा भरण्याची पद्धत सर्वांत धक्का देणारी आहे : कांहींतरी पदवी असलेल्या, कांहींएक हक्क किंवा सवलती न मागणाऱ्या आणि सरकारी प्रणालीचीं मूलतत्त्वें आत्मसात करणाऱ्या कोणालाहि निव्वळ एवढयाच अटींवर भरती करून घेण्यांत आलें.

संपूर्णपणें कायापालट झालेल्या ह्या विद्यापीठांत आपलें नांव घालण्याबाबत क्यूबांतील तरुणांत नाखुषी आहे. आणि तात्पुरतें १९६०–६१ ह्या शैक्षणिक वर्षाचे अभ्यासक्रम बंद ठेवणें Junta ला भाग पडलें आहे.

## दक्षिणी निग्रोचें सीमोल्लंघन

'गांधी' शब्दाचें स्पेलिंग Ghandy असें केलें असलें, तरी contemporary Issues च्या चाळीसाव्या अंकांतील श्री. पॉल एकर यांच्या प्रस्तुत लेखांत अमेरिकेच्या खास स्वतःच्या वर्णविच्छेदाच्या समस्येवर गांधीजींचें शांततामय असहयोगाचें तंत्र हाच तोडगा आहे, हें मान्य केलें आहे.

लंच-कांउटर्सवर व उपाहार-गृहांत स्वस्थ बसून राहण्याच्या दक्षिणी निग्रो विद्यार्थ्यांच्या निदर्शनानें अमेरिकेंतील वर्णविच्छेदाचें उच्चाटन करण्याच्या चळवळीनें निश्चितपणें एका नव्या पर्वांत पदार्पण केलें आहे. ह्या सर्वांत सुप्रीम कोर्ट, न्यायखातें किंवा आपल्या वकीलापेक्षांहि निग्रो माणसानें स्वतःच रंगभूमि व्यापली आहे. यांत तो यशस्वी होईल, ह्यांत शंकाच नाहीं.

गुलामगिरीची पद्धत असलेल्या समाजांतील शतकापूर्वीचे अवशेष उद्योगधंद्याच्या विकासापुढें धूलिसात् होत आहेत. त्या भूमीवर कापूस हा आतां राजा उरलेला नाहीं, कापूस वेंचणारा मजूर राहिलेला नाहीं. आर्थिक परिवर्तनाच्या रसायनामुळें ठिसूळ झालेल्या ह्या अवशेषांना उध्वस्त करायला सामाजिक क्रियेच्या शक्तीची फक्त आवश्यकता आहे. ही शक्ति आतां लावली जात आहे.

मुक्ततेच्या जाहीर घोषणेनें गुलामगिरीच्या शृंखला तोडल्यानंतर वीस वर्षांच्या अवधींतहि निग्रोंचें नागरीकत्व ही फक्त एक कायद्यांतील कल्पित कथाच राहिली होती. लिखित आणि अलिखित कायद्यांनीं त्याला कित्येक गोष्टी नाकारल्या होत्या : शैक्षणिक, करमणुकीच्या क्षेत्रांतील व इतर सामाजिक सवलतींची मोकळीक. प्रत्यक्षतः त्याला नागरिकत्वाचे कांहीं अधिकार नव्हते.

वंश–संबंधांचा हा आराखडा १९४० ते ५० ह्या दशकापर्यंत कायम टिकून राहला. १५० वर्षांनंतर उत्तरेकडल्या उद्योगधंद्यांना दक्षिण अमेरिकेचा शोध लागायला सुरवात झाली : दक्षिणेंतला कच्च्या मालाचा मुबलक सांठा, स्वस्त दरांत मिळणारे श्रमिक व ट्रेड युनियनच्या तत्त्वाला कडवा विरोध. युद्धोत्तर काळांत प्रमुख भांडवल एका विशिष्ट दिशेनें गुंतवलें गेलें. कित्येक कंपन्यांनीं-यांत कापडधंदा अग्रस्थानीं होता–आपली सर्व यंत्रसामग्रीहि–परंतु कामगार मात्र नव्हेत-नव्या औद्योगिक सीमेकडे नेली. त्यांना कसबी व साक्षर कामगारांची जरूरी होती. काळे आणि गोरे दोन्ही, पूर्वीच्या वर्णविग्रहाच्या जोखडांतून सुटलेले. ह्या उद्योगधंद्यांच्या बरोबरच ट्रेड युनियन्सनींहि पण स्थलांतर केलें. त्यांत C. I. O. सारख्या वर्गविच्छेदाची परंपराच नसलेल्या व काळ्या गोऱ्यांचा अनिर्बंध समावेश करण्याचा निर्धार असलेल्या संघटनाहि आल्या. इतर क्षेत्रांतहि चाकें ह्याच दिशेनें फिरत होतीं. दुसऱ्या महायुद्धांत उत्तरेकडील दारुगोळ्याच्या कारखान्यांत व सैन्यांत (फक्त बरॅकीच्या चार भिंतींपुरतीच का होईना) दक्षिणी निग्रोंना समानता सांपडली होती. युद्ध संपल्यावर ते घरीं परतले, परंतु तेथें परत गुलामगिरी सहन करण्याची








वृत्ति त्यांच्यांत नव्हती. G. I. Bill of Rights मुळें प्रथमतःच निग्रोंना शिक्षणाची व उद्‌बुद्ध जाणीवेची संधि प्राप्त झाली. निग्रोंचे प्रमुख कल्याणकर्ते म्हणून मिरवणाऱ्या गोरे शेतकरी, जमीनदार व किरकोळ व्यापारी ह्या वर्गांचें वजन वाढत्या औद्योगिक अर्थकारणांत कमी झालें. वंशगत गुलामागिरीचे आधारस्तंभ खचूं लागले.

दुय्यम दर्जाचें नागरीकत्व मान्य करण्याच्या निग्रोंच्या वाढत्या नाखुषीला प्रथम कोर्टांत तोंड फुटलें. वहातुकींत, शाळांत व करमणुकीच्या स्थळीं पाळण्यांत येणाऱ्या विग्रहाविरुद्ध भरलेल्या खटल्यांची संख्या कुत्र्याच्या छत्र्यांप्रमाणें वाढली. शेवटीं १९५४ सालीं सुप्रीम कोर्टानें आपलें साठ वर्षांपूर्वीचें 'विभक्त पण समान' हें तत्त्व मागें घेऊन ह्या पद्धतीविरुद्ध एकप्रकारें मरण-वॉरंटच काढलें. पण ह्या वॉरंटाची तामिली व्हायचें तसेंच राहिलें.

कोर्टांच्या कंटाळवाण्या रगाड्यांतून होणारी शैक्षणिक क्षेत्रांतील ह्या कायद्याची तामिली मुंगीच्या पावलानें होणारी आहे. सुप्रीम कोर्टाच्या अविभक्ततेच्या निर्णयानंतर आज सहा वर्षांनंतरहि उत्तर कॅरोलिना, व्हर्जीनिया आणि सीमेवरील कांहीं राज्यांतल्या अतिशय थोडक्यां शाळांतच फक्त, अविभक्ततेचें प्रतीक म्हणून कांहीं निग्रो विद्यार्थ्यांना प्रवेश देण्याची सक्ति करण्यांत आली आहे. खटल्यांच्या मार्गानें होणारी प्रगति म्हणजे विभक्ततेच्या जाडजूड भक्कम भिंती पाडण्याकरतां छिन्नी वापरण्यासारखें आहे. ह्या मार्गानें निराशेखेरीज आणखी कांहींच निग्रोंच्या पदरीं पडत नाहीं. आणि निग्रो विद्यार्थी कांहीं शाळेंत स्वस्थ बसून राहूं शकत नाहींत.

मॉंटगोमरी व तालाहेस येथें बसेसवर टाकला गेलेला बहिष्कार, हें शैक्षणिक क्षेत्रांत अविभक्ततेकरतां गोगलगाईच्या गतीनें होणाऱ्या प्रगतीबद्दलच्या असंतोषाचें पहिलें निदर्शन होतें. ह्यामुळें अगदीं मर्यादित स्वरूपांतच यश मिळालें, तरी त्यामुळेंच विभक्ततेविरुद्धच्या चळवळीला नवे मार्ग दिसले. त्यामुळें निव्वळ तत्काळ यशाची शक्यताच तेवढी निर्माण झाली असें नव्हे, तर एका अर्थपूर्ण प्रयत्नांत आपण जाणीवपूर्वक सहभागी होत आहोंत, हा बोध निग्रो लोकांत निर्माण झाला. महात्मा गांधींचें 'शांततापूर्ण असहयोगा'चें तंत्र प्रथमच अमेरिकन पटभूमीवर अवलंबिलें गेलें. हें तंत्र खरें म्हणजे, त्याच्या मूळच्या कार्यक्षेत्रापेक्षां अमेरिकेंतच अधिक कार्यकारी व उचित आहे.

संप, बहिष्कार, मोठ्या प्रमाणावरील निदर्शनें, काम न करतां आपल्या जागीं स्वस्थ बसून राहणें, इत्यादि घटकांनीं बनलेल्या ह्या 'अहिंसक चळवळी'च्या तंत्रांची परिणामकारकता सिद्ध झालेली आहे. आणि प्रधान तत्त्व म्हणून, युद्धहीन मतवादाची कोनशिला म्हणून त्याचा उदोउदो केला तरच तें विनाशक ठरेल, असें आहे. चळवळीचा एक अविभाज्य नियम, उपदेशाकरतां एक विषय, प्रतिपक्ष जमेस न धरतां कवटाळलेलें अनुल्लंघनीय नीतितत्त्व म्हणून मानलेली अहिंसा ही एक चीज झाली; आणि एका विशिष्ट परिस्थितीला तोंड देण्यासाठीं अवलंबिलेलें एक खास साधन म्हणून वापरलेली अहिंसा ही वेगळीच चीज आहे. दक्षिण अमेरिकेंत निग्रोंचें बहुमत नाहीं आणि आत्मरक्षणार्थ केलेली हिंसासुद्धां कत्तलीला कारणीभूत होईल, अशा परिस्थतींत गांधींनीं शोधून काढलेलीं हीं शस्त्रें अद्वितीय अशींच आहेत. कोणत्याहि प्रकारची मध्यवर्ती सूचना वा योजना नसतांनाहि विद्यार्थ्यांनीं लंच-काउंटरसवर केलेल्या स्वस्थ बसून राहण्याच्या उत्स्फूर्त निदर्शनांमुळें, ह्या शस्त्रांच्या औचित्याला दुजोराच मिळतो.

हीं निदर्शनें जरी उत्स्फूर्तपणें उद्‌भवलीं, तरी त्यांनीं दाखवलेली दिशा Congress for Racial Equality ह्या १८ वर्षें संधीची वाट पहाणाऱ्या व गांधींच्या मार्गावर विश्वास असणाऱ्या संस्थेनें पकडली आहे. निग्रोंना माल देण्याचें नाकारणाऱ्या दुकानांवर बहिष्कार, निदर्शनें व पिकेटिंग इत्यादि त्यांनीं आयोजित केले आहेत. दक्षिणेंतल्या सर्वच निग्रो विद्यार्थ्यांत ही चळवळ फैलावली आहे. उत्तरेंतहि पिकेटिंग व निदर्शनांच्या साहाय्यानें ह्या चळवळीनें खूपच सहानुभूति मिळवली आहे. अशा प्रकारें सहानुभूति दाखवणाऱ्यांत काळे आणि गोरे दोन्ही लोक आहेत. दोन दशकें कोणत्याहि सामाजिक चळवळींत सहभागी न झालेल्या गोऱ्या कॉलेज-विद्यार्थ्यांनींहि ह्या चळवळीला पाठिंबा दिला आहे, हें विशेष उल्लेखनीय आहे. इतके दिवस गुलाम-



अनुक्रमणिका






गिरी आणि भीति यांच्या दडपणाखालीं जगणाऱ्या सर्वच निग्रो लोकांकडून ह्या चळवळीला मिळालेला खंबीर पाठिंबा, ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे. नॅश्व्हिलच्या निदर्शनांत हें स्पष्ट दिसून आलें. ह्या प्रकारामुळें " आतां आपला ' खासपणा ' फक्त अतिशय बदललेल्या स्वरूपांत राहूं शकेल " असें अधिकाधिक दाक्षिणात्य गोऱ्यांना वाटूं लागलें आहे. लंच-काउंटर्स मोहिमेनें किंवा तिच्या निव्वळ धमकीनें शहरोशहरींच्या विभक्त लंच-काउंटर्सना नमवलें आहे. लंच-काउंटर्सनंतर आतां प्रतीक्षालयें, उद्यानें आणि पोहण्याचे तलाव याबाबतहि अशीच उपाययोजना करण्यांत येईल. विरोध फार काळ टिकूं शकणार नाहीं, कारण धंदेवाईक हितसंबंधांना अधिक जपणारीं वरच्या वर्गांतलीं बडीं धेंडें व उच्च मध्यम-वर्गांतील लोकहि आतां कडव्या विरोधकांच्या कंपूंतून बाहेर पडत आहेत. लिट्लरॉकनें दिलेला धडा इतर ठिकाणच्या व्यापारी मंडळींनीं घेतला आहे. विभक्तता ही त्यांच्या मतें एक खर्चाची बाब होऊन बसली आहे.

शालेय विभक्ततेविरुद्ध दिलेला लढा अनेक निग्रोंनाहि आपला वाटत नव्हता, परंतु लंच-काउंटर्सच्या मोहिमेनें दक्षिण अमेरिकेच्या सर्व निग्रो रहिवाश्यांना आकर्षित केलें आहे. हें ह्या मोहिमेनें पार पाडलेलें सर्वांत महत्त्वाचें कार्य आहे.

दक्षिण अमेरिकेच्या सामाजिक जीवनाची किल्ली आज उत्तरीय भांडवलाच्या हातीं आहे; आपल्या नव्या सीमेवरली वांशिक उलथापालथ त्याला सहन होणें शक्यच नाहीं. दक्षिण अमेरिकेला लौकरच कळून येईल, कीं निग्रोला राजकीय स्वातंत्र्य ही आपण विसाव्या शतकांत जाण्याच्या तिकिटाकरतां दिलेली किंमत आहे.

## मॉस्कोची कम्युनिस्ट परिषद

मास्को येथें नुकत्याच भरलेल्या ८१ कम्युनिस्ट पक्षांच्या परिषदेनें एक पत्रक प्रसिद्ध केलेलें आहे. Institute for the study of USSR ह्या संस्थेतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या बुलेटिनच्या जानेवारी १९६१ च्या अंकांत श्री. स्टीफन सी स्टोल्ट ह्यांनीं वरील पत्रकावर लिहिलेल्या लेखांतील कांहीं भाग येथें देत आहोंत. ह्या परिषदेच्या आधीं स्टालीनग्राद येथें Soviet Afro-Asian Solidarity Conference भरलेली होती. मॉस्कोच्या परिषदेसाठीं ह्या परिषदेनें पार्श्वभूमीच तयार करून ठेवली होती. मागासलेल्या देशांसंबंधींचा कम्युनिस्टांचा दृष्टिकोन ह्या दोन्ही परिषदांच्या निमित्तानें उघड झालेला आहे.

८१ कम्युनिस्ट पक्षांच्या मॉस्को येथें नुकत्याच भरलेल्या परिषदेनें एक पत्रक प्रसिद्ध केलेलें आहे. ह्या पत्रकाशी १९५७ सालीं प्रसिद्ध झालेल्या अशाच पत्रकाशी तुलना केली तर एक गोष्ट नजरेंत भरते. पाश्चिमात्य वसाहतवाद आणि मागासलेलीं राष्ट्रें यासंबंधीच्या दृष्टिकोनांत बदल पडलेला आहे. एकच तत्त्व कायम राहिलें आहे. पाश्चिमात्यांच्या वसाहतवादाचा ऊहापोह करण्यांत आलेला आहे. सोव्हिएट रशिया आणि चीन यांच्या वसाहतविषयक धोरणांना ह्या चर्चेतून सोयिस्कररीत्या वगळण्यांत आलें आहे.

कम्युनिस्टांच्या धोरणांतील हा बदल अनपेक्षित मुळीच नाहीं. वरील पत्रक प्रसिद्ध होण्यापूर्वींच कम्युनिस्टांच्या धोरणांतील मूलगामी बदल नज़रेस येऊं लागलेले होते. क्युबा आणि कॉंगो येथील घटनांबाबत कम्युनिस्टांचें धोरण चढाईचें होतें आणि तेथील नेत्यांवर कम्युनिस्ट तत्त्वप्रणालीचा प्रभाव जास्तीत जास्त पाडण्याचे प्रयत्न होत होते. क्युबाच्या वार्ताहरांशीं बोलतांना श्री. क्रुश्चेव्ह यांनीं फिडेल कॅस्ट्रोची तुलना लेनिनशी केली. मॉस्कोचें हें वसाहतविरोधी धोरण प्रत्यक्षांत उतरविण्यासाठीं करण्यांत आलेला मुख्य प्रयत्न म्हणजे १९६० ऑक्टोबरची स्टालीनग्राद येथील Soviet Afro-Asian Solidarity Conference. कैरो येथील Afro Asian Solidarity Committee त कम्युनिस्टांची डाळ शिजेना म्हणून तिला शह देण्यासाठीं ही दुसरी संघटना.

स्टालिनग्रादच्या परिषदेंतील धोरणाचाच पाठपुरावा मॉस्कोच्या पत्रकांत दिसून येतो. मॉस्कोच्या पत्रकांत ह्या धोरणाच्या अनुषंगानेंच एक निश्चित कार्यक्रम आंखलेला दिसतो.

प्रत्येक स्वतंत्र राष्ट्रांतील शेतकरी, कामगार, मध्यम वर्ग, 'the national baurgeoise' आणि इतर लोकशाही राष्ट्रीय गट यांची फळी साम्राज्यवादाविरुद्ध उभी करणें ही एक महत्त्वाची गरज आहे असें १९५७ चें पत्रक म्हणतें. ह्याचाच पुनरुच्चार करून










१९६०चें पत्रक पुढें असेंहि म्हणतें कीं प्रत्येक राष्ट्राच्या अर्थव्यवस्थेंत विशेषतः औद्योगिक क्षेत्रांत state sector निर्माण झाला पाहिजे. हा state sector परदेशी monopolies पासून स्वतंत्र असला पाहिजे आणि राष्ट्राच्या अर्थव्यवस्थेवर महत्वाचा प्रभाव पाडण्यास तो समर्थ असला पाहिजे. The national bourgeoise ह्या वर्गाचा क्रांतिकारक लढ्यांचा प्रगतीला उपयोग होतो हें मान्य करूनसुद्धां हा वर्ग फार डळमळीत आणि साम्राज्यवादी प्रभावांना बळी पडणारा आहे ही धोक्याची सूचनाहि ह्या पत्रकांत देऊन ठेवलेली आहे.

निरनिराळया देशांत national democratic state स्थापन होण्यासाठीं आवश्यक असलेल्या अनुकूल परिस्थितीची चर्चाहि ह्या पत्रकांत आलेली आहे. ह्या पत्रकांत अभिप्रेत असलेला हा कार्यक्रम जर प्रत्यक्षांत उतरला तर हीं राष्ट्रें " People's democracies " म्हणून ओळखण्यांत न येतां " national democracies" म्हणून ओळखण्यांत येतील. मॉस्कोच्या प्रभावापासून हीं राष्ट्रें स्वतंत्र आहेत हें दर्शविण्यासाठींच हा प्रयत्न. इतर सोशलिस्ट राष्ट्रांबरोबर सांस्कृतिक व आर्थिक सहकार्य करणें हें एक ह्या राष्ट्रांचें महत्त्वाचें काम राहील. १९५७ च्या पत्रकान्वयें इतर लोकशाही पक्षांबरोबरचें ( social-democratic Parties ) सहकार्य मान्य करण्यांत आलेलें होतें. परंतु १९६० च्या पत्रकांत हे पक्ष सोशलिस्ट घोषणांचा आपल्या फायद्यासाठींच उपयोग करून घेतील अशी धोक्याची सूचनाहि दिलेली आहे. सोशलिस्ट राष्ट्रें स्वतःच्या अंतर्गत कारभारांत इतर राष्ट्रांची ढवळाढवळ सहन करणार नाहीत पण- ह्या देशांनीं औद्योगिक क्षेत्रांत state sector निर्माण केला पाहिजे, इतर सोशलिस्ट राष्ट्रांना सहकार्य दिलें पाहिजे इतकेंच नव्हे तर 'सोशलिझम 'चा अर्थ त्यांनी मॉस्कोकडूनच शिकावयास हवा. आणि मॉस्कोच्या अर्थाप्रमाणेंच त्यांनीं सोशलिझम स्वीकारला तरच मॉस्को त्यांच्या अंतर्गत कारभारांत ढवळाढवळ करणार नाहीं.

ह्या पत्रकाच्या आशयाचा वरीलप्रमाणें अर्थ घेणें ह्यांत अतिशयोक्ति अजिबात नाहीं. ह्याचा ढळढळीत पुरावा म्हणजे युगोस्लाव्हिया. प्रतिगामी युगोस्लाव्हियाचा धिक्कार ह्या पत्रकांत पुन्हा एकदां झालेला आहे. युगोस्लाव्ह कम्युनिस्टांचें मुखपत्र Borba नें ह्या आरोपाला उत्तर देतानां म्हटलें आहे कीं सोशलिस्ट गटाशी संबंध न ठेवतां आपलें धोरण स्वतंत्रपणानें आंखणें हीच काय ती युगोस्लाव्हियाची चूक.

मागासलेल्या देशांच्या प्रश्नावर सारें लक्ष केंद्रित करून चीन–रशिया यांच्या दरम्यानच्या तेढीच्या वातावरणाकडे दुर्लक्ष करण्याचा प्रयत्न ह्या पत्रकांत करण्यांत आलेला आहे. परंतु कम्युनिस्ट गटावरील वर्चस्वाबाबत ह्या दोन राष्ट्रांत स्पर्धा चालू आहे ह्यात संशय नाहीं. इतर कम्युनिस्ट राष्ट्रांतील अनेक मुत्सद्यांना रशियापेक्षां चीनच जास्त जवळचा वाटतो.

चीनपेक्षां आपण जास्त पुरोगामी आहोंत हें सिद्ध करण्याचा प्रयत्न श्री. क्रुश्चेव्ह यांनीं संयुक्त राष्ट्रांच्या आमसभेपूर्वी केला. पाश्चिमात्यांच्या वर्चस्वाखालील सर्व वसाहती ताबडतोब स्वतंत्र करण्यांत याव्यात असा प्रस्ताव त्यांनीं मांडला आणि त्याचबरोबर रशियन वसाहतींच्या प्रगतीचा अहवाल पुढें ठेऊन रशियाचें पुरोगामित्व सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. परंतु ह्या उत्साहाच्या भरांत श्री. क्रुश्चेव्ह यांनीं असेंहि विधान केलें कीं आमच्या घटनेप्रमाणें आमच्या संघराज्याच्या पंधरा घटकांपैकीं कुणालाहि आपल्या मर्जीनुसार संघराज्यांत असण्याचें किंवा तें सोडून जाण्याचें स्वातंत्र्य आहे. ' श्रोत्यांच्या मनांत हंगेरी आणि तिबेटी येथील घटना ताज्या असल्यामुळें क्रुश्चेव्हचें हें विधान त्यांच्यावरच उलटलें.

१९५७ च्या पत्रकाचा असा दावा होता कीं जगांतील ९५० दशलक्ष लोकांनीं समाजवादाचा मार्ग पत्करला असून ७०० दशलक्षांहूनहि जास्त लोकांनी वसाहतवादाचें जोखड झुगारून दिलेलें आहे. १९५७ नंतर अनेक राष्ट्रांनीं नव्यानेंच स्वातंत्र्य मिळविलें आहे आणि ह्या राष्ट्रांकरितां नुकतीच झालेली संयुक्त राष्ट्रांची बैठक ही फार मोठी कसोटी होती. ह्या बैठकीपासून कम्युनिस्ट गटाला विशेष फायदा उठवितां आला नाहीं. आपल्या धोरणाची सफलता जर मॉस्कोला लवकरांत लवकर पदरांत पाडून घ्यावयाची असेल तर ह्या नवीन राष्ट्रांत Communist coupd ' e 'tat लवकरांत








अनुक्रमणिका

लवकर झाला पाहिजे. ह्या परिस्थितीला तोंड देण्यासाठीं १९६० च्या पत्रकांत पुढील माहिती मुद्दाम देण्यांत आलेली आहे. 'आज जगांतील एकंदर ८७ देशांत कम्युनिस्ट पार्टी काम करीत आहे आणि तिच्या संघटनेंत एकंदर ३६ दशलक्ष लोक काम करीत आहेत! कुणाला असेंहि वाटेल कीं ३६ दशलक्षांना केवळ ९५० दशलक्षांवरच हुकुमत चालवणें अपुरें वाटत असून इतर ७०० दशलक्षांच्या आयुष्याचें भवितव्य ठरवण्यासाठींहि ते उत्सुक झालेले आहेत. ह्यावर असें म्हणतां येईल की कम्युनिस्टांचीं ध्येयधोरणें हीं नेहमींच राष्ट्राच्या अत्युच्च कल्याणाशीं सुसंगत अशींच असतात.

परंतु रशिया आणि चीन यांच्यामधील तणातणी हीच कांहीं फक्त स्टालीनबादची परिषद् बोलावण्याला एकमेव कारण नव्हती. इतर राष्ट्रांना आर्थिक मदत देण्याचा कम्युनिस्टांचा कार्यक्रम जवळ जवळ कोसळून पडण्याच्या बेतांत आहे. Hamburg Welt-wirtschasts-Archiv नें जुलै १९६० मध्यें प्रसिद्ध केलेल्या माहितीप्रमाणें मागासलेल्या देशांना एकंदर ३००० दशलक्ष डॉलर्स किंमतीची मदत देण्याचें आश्वासन देण्यांत आलें होतें. परंतु प्रत्यक्षांत मात्र जून १९६० अखेरपर्यंत फक्त ५५० दशलक्ष किंमतीचीच मदत रशियाकडून देण्यांत आलेली आहे.

इतर पौर्वात्य कम्युनिस्ट गटांतलि राष्ट्रांची आर्थिक परिस्थिति समाधानकारक नसल्यामुळें रशियाला त्यांच्याबाबतच्या आपल्या धोरणामध्येंहि मूलगामी बदल करावे लागत आहेत. रशियाची स्वतःची चालू पंचवार्षिक योजनाहि आतां सप्तवार्षिक योजना करावी लागली आहे. जानेवारी १९५९ च्या २१ व्या पार्टी कॉंग्रेसमध्यें क्रुश्चेव्हनें अशी घोषणा केली होती कीं १९७० मध्यें एकंदर उत्पादन आणि दर माणशीं उत्पादन यांच्या बाबतींत रशिया अमेरिकेला मागें टाकील. परंतु नुकतेंच क्युबाच्या वार्ताहरांशीं बोलतांना त्यांनीं कबूल केलें कीं फक्त कांहीं महत्त्वाच्या चिजांच्या उत्पादनाच्या बाबतींतच ही परिस्थिति १९७० पर्यंत रशिया गांठूं शकेल.

इतर राष्ट्रांना देण्यांत येणारी आर्थिक मदत आणि उत्पादनाच्या बाबतींतली अमेरिकेशी स्पर्धा या दोन्ही बाबतींत रशियाला अपयश आलेलें आहे. आणि म्हणूनच कोणत्या ना कोणत्या बाबतींत आपलें यश दाखवून पेकिंग बरोबरील वर्चस्वाच्या झगड्यांत आपलें धोरण बरोबर आहे हें सिद्ध करण्यासाठीं वर्गयुद्धाचें हें रोपटें आतां मागासलेल्या देशांत लावण्याखेरीज श्री. क्रुश्चेव्ह आणि त्यांचे सहकारी यांना दुसरा इलाज नाहीं.

---





अनुक्रमणिका

डॉ. ग. ना. जोशी

# ' गुरुदेव रवीन्द्रनाथ ठाकूर यांचें जीवनदर्शन '

आधुनिक भारतांत लोकोत्तर व्यक्तिमत्त्वाचीं जीं कांहीं माणसें होऊन गेलीं त्यांत गुरुदेव रवीन्द्रनाथ ठाकूर यांचें स्थान खूपच वरच्या दर्जाचें होतें. रवीन्द्रनाथांचें व्यक्तिमत्त्व भव्य, दिव्य, संपन्न, बहुरंगी व आदर्श असें होतें. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत व विसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत ज्या महनीय व्यक्ति होऊन गेल्या त्यांत रवीन्द्रनाथ हे एका तेजस्वी ताऱ्या प्रमाणें चमकले. त्यांनीं जीवनाच्या विविध अंगांत मोलाचें कार्य करून भर घातली, एवढेंच नव्हे तर भारताचे एक सुपुत्र म्हणून त्यांनीं जगभर स्वतः हिंडून मोलाचें कार्य केलें व भारतीय संस्कृतीच्या श्रेष्ठत्वाचा परिचय अखिल जगास करून दिला.

भारताच्या इतर नेत्यांप्रमाणें रवींद्रनाथ शाळा-कॉलेजच्या चाकोरींत तयार झालेले नव्हते. शालेय-शिक्षण त्यांच्या मनाच्या पिंडाला मानवणारें नव्हतें व त्यामुळें कॉलेजांत शिकण्याची संधि त्यांना मिळाली नव्हती; तरीहि स्वतः ज्ञानाची थोर उपासना करून त्यांनीं अपार ज्ञान संपादिलें होतें. कला, तत्त्वज्ञान, नाटकें, काव्य, इतिहास व विज्ञान या सर्व क्षेत्रांत त्यांनीं मुक्त संचार केला होता. ज्ञानाच्या विविध शाखांशीं अत्यंत निकट व खोल असा परिचय करून घेऊन आपलें साहित्य बुद्धिवाद्यांना पटावें व आवडावें अशा रीतीनें त्यांनीं निर्माण केलें. त्यांच्या जवळ असामान्य प्रतिभा व सर्जनशक्ति होती. अगदीं अल्पवयांतच त्यांनीं काव्यलेखनाला सुरुवात केली व त्यांची काव्यनिर्मिति सतत त्यांच्या जीवनाच्या अंतापर्यंत अप्रतिहतपणें चालू राहिली होती.

## रवींद्रनाथांच्या मनोविश्वाची घडण

रवीन्द्रनाथांना अत्यंत श्रेष्ठ प्रकारचा सांस्कृतिक व आध्यात्मिक वारसा त्यांचे वडील व आजोबा यांचेकडून मिळाला होता. बंगालमधील एका सधन व सुसंस्कृत जमीनदाराच्या घरांत त्यांचा जन्म झालेला असल्यानें त्यांना भौतिक समृद्धि तर जन्मतःच लाभली होती पण त्याच बरोबर त्यांच्या घरांत त्यांच्या लहानपणापासून उच्च अभिरुचीच्या संस्कृतीचे व आध्यात्मिक जीवनाचे संस्कारहि त्यांच्या मनावर झाले होते. बंगालच्या निसर्गसुंदर व रम्य भूमींत त्यांचें बालपण व पुढील जीवन गेल्यामुळें त्यांच्या रसिक मनाचें पोषण उत्तम प्रकारें झालें होतें बंगालमधील पद्मा, मेघना व गंगा या नद्यांच्या विस्तीर्ण व शांत पात्रांत त्यांनीं मनसोक्त जलविहार केला होता; या नद्यांच्या जलावरून वाहणाऱ्या मंद-शीतल वाऱ्यांच्या झुळुकांनीं ते सुखावले होते, पुलकित झाले होते. बंगालच्या आकाशांत सतत स्वैरपणानें संचार करणाऱ्या शुभ्र-श्यामल वारिदांनीं रवींद्रांच्या मनांत एक प्रकारची उत्कंठा व हुरहुर निर्माण केली होती. तेथें सतत कोसळणाऱ्या द्रुत व मंद वारिधारांनीं त्यांची काया व मन यांना अभिषिंचित केलें होतें. बंगालमधले मेघ, मेघगर्जना, पर्जन्य, शीतल वारे, नक्षत्रांनीं व ताऱ्यांनीं प्रकाशित झालेलें आकाश, प्रसन्न चंद्रमा व मधुर ज्योत्स्ना, सुगंधी व विविधरंगी फुलें, रसपूर्ण फळें, पक्ष्यांचें मधुर कूजन व गायन, हरितवर्णी श्यामल भूमि, घनदाट वृक्षराजी, मंजुळ गाणीं गात स्रवणारें प्रस्रवण या सर्व विविध निसर्गवस्तूंचे त्यांच्या मृदु, संवदेनाशील व संस्कारशील मनावर खोल








ठसे उमटले होते. त्यांना हा बहुरंगी, रम्य व समृद्ध निसर्ग जणुं परमेश्वर वाटत होता. रवींद्रांच्या रसिक पिंडाचें पोषण या श्रीमंत निसर्गावर झालें होतें; आणि म्हणून त्यांना कृत्रिम जीवनाचा, यांत्रिक शहरी जीवनाचा अति कंटाळा येत असे. शहरांत ते कधीं मोकळेपणानें राहूं शकत नसत. त्यांनीं आपल्या एका पत्रांत असें म्हटलें आहे कीं, लंडन व कलकत्ता येथील वर्दळीचें, गर्दीचें व यंत्रमय जीवन माझ्या मनाचा कोंडमारा करतें, व आत्म्याला जणुं मारून टाकूं पहातें. बोलपूरच्या शांतिनिकेतनच्या व श्रीनिकेतनच्या निसर्गरम्य व मोकळ्या हवेंत, वृक्षांच्या घनदाट छायेंत, पक्ष्यांच्या मधुर संगीताच्या पार्श्वभूमीवरच ते आपले दिवस शांतपणें घालवीत. तेथील रम्य व प्रसन्न वातावरणांत त्यांना स्फूर्ति व प्रेरणा मिळून त्यांच्याकडून अप्रतिहतपणें कला व काव्यनिर्मिती होत राही.

रवीन्द्रनाथांचें शालेय जीवन अपयशी ठरलें तरी त्यांच्या ठिकाणीं सर्जनाची जी मूलभूत प्रेरणा होती तिच्यामुळें ते एक प्रतिभासंपन्न व यशस्वी कलावंत व साहित्यिक बनले — त्यांच्या मृदु मनावर बालपणांतच वैष्णव संतकवींच्या कवनांचा व उपनिषदांचा अत्यंत प्रभावी परिणाम झालेला होता. उपनिषदांतील काव्यात्मक व तात्त्विक विचारांनीं ते न्हाऊन माखून निघाले होते. उपनिषदांतील ऋषींच्या वाणीनें कायमचे भारले गेले होते. उपनिषदांतील तात्त्विक विचारांनीं त्यांच्या तात्त्विक व जीवनविषयक विचारांची घडण झालेली होती; आणि म्हणून रवींद्रनाथ हे केवळ एक कवि व कलावंत न राहतां उपनिषद्कर्त्या ऋषींच्या दर्जाचे एक थोर द्रष्टे तत्त्वज्ञहि बनले होते. आपल्या Sadhana, Personality, Creative Unity, Religion of Man या सर्व तात्त्विक ग्रंथांतून त्यांनीं आपल्या जीवनाचें तत्त्वज्ञान मांडलें आहे. रवींद्रांचा आत्मा अत्यंत विशाल व अनंत जीवनाचा प्रेमी होता. एका लहानशा कुटुंबाचा संसार करून त्यांत इतिकर्तव्यता मानून संतुष्ट राहण्याची संसारी माणसाची वृत्ति त्यांच्या ठिकाणीं मुळांतच नव्हती. त्यांनीं आपल्या मुलींना लिहिलेल्या एका पत्रांत म्हटलें आहे — "After repeated examinations and tests, I have clearly realised that God has not created me for a householder's life." त्यांनीं लहानपणासूनच केवळ स्वतःचा व स्वतःपुरता किंवा स्वतःच्या लहानशा घराचा व कुटुंबाचा विचार न करतां अखिल जगाचा व विश्वाचा विचार केला. बालपणापासूनच त्यांना विश्वात्मकतेची व अनंतत्वाची जाणीव होती व सदैव विश्वाच्या अनंततेंत अवगाहन करण्याची त्यांना तीव्र इच्छा होती. त्यांना अनंताचें Infinite जबरदस्त आकर्षण वाटत असे, व त्यांच्या सर्व काव्यांत व विचारांत प्रामुख्यानें त्यांची ही अनंतत्वाची ओढ व्यक्त झालेली सांपडते. भव्यता, विशालता, अनंतता, असीमता व सनातनता या गोष्टींची अनावर मोहिनी त्यांच्या मनाला होती; आणि म्हणून त्यांनीं सदैव या विश्वाच्या मुळाशीं असलेल्या व चराचर विश्वाला वेष्टन घालून व्यापून राहिलेल्या अंतिम तत्त्वाचा ध्यास घेतलेला सांपडतो. त्यांच्या एक्काहत्तराव्या जयंतीच्या निमित्तानें बंगालनें त्यांचा कलकत्त्याला एका प्रचंड सभेंत सत्कार केला त्याप्रसंगीं उत्तरादाखल भाषण करतांना ते म्हणाले होते — " आज सत्तराव्या वर्षी सर्वसाधारण जनतेशीं माझा परिचय एकप्रकारें परिणतीला पोंचला आहे. म्हणून मला आशा आहे कीं मला जाणण्याचा ज्यांनीं थोडा फार प्रयत्न केला असेल त्यांना इतक्या दिवसानंतर एवढें तरी समजून आलें असेल कीं जीर्ण जगतांत मी जन्म घेतला नाहीं. मी नेत्र उघडून जें कांहीं पाहिलें त्यामुळें माझ्या नेत्रांना कधींच शीण आला नाहीं, त्यांतील विस्मयाचा अंत कधीं लागला नाहीं, चराचराला वेष्टन करून अनादि











कालाची जी अनाहत वाणी अनंत कालाकडे वाजत चालली आहे, तिला मी आपल्या प्राणा-मनांनीं साथ देत आलों आहे. युगानुयुगीं ही विश्ववाणी मी ऐकत आलों आहे, असें मला सदैव वाटलें आहे. सूर्यमंडलाशेजारीं या आमच्या छोट्या शामल पृथ्वीला ऋतूंचे आकाशदूत विविधरसांच्या वर्णवस्त्रांनीं सजवीत असतात, त्या प्रीतीच्या समारंभामध्यें आपल्या हृदयाच्या अभिषेक जलानें भाग घेण्यास मी कधींहि आळस केलेला नाहीं. प्रतिदिनीं उषःकालीं काळोख्या रात्रीच्या अंतीं "यत्तेरूपं कल्याणतमं तत्ते पश्यामि" या गोष्टीचा साक्षात्कार करून घेण्यासाठीं मी शांतपणें उभा राहिलों आहे. सकलवस्तुजाताच्या आत्मीय संबंधाचें जें ऐक्यतत्त्व आहे, त्याच्या आनंदामुळेंच निरंतर असंख्य रूपांच्या प्रकाशानें विविध प्रकारें माझें जीवन आनंदित होतें आणि "को ह्येवान्यात् कः प्राण्यात् यदेष आकाश आनन्दो न स्यात्" असें बोलूं लागतें. या विश्वांत सर्वत्र जें सनातन, अनंत व आनंदमय असें आत्मतत्त्व भरून राहिलें आहे त्या विराट तत्त्वाला प्रत्यक्ष स्पर्श करण्याची, तें स्वतः अनुभवण्याची आकांक्षा त्यांनीं धरली होती. त्यांच्या तत्त्वज्ञानाचें मर्म त्यांच्या या अनंतावरील प्रेमांत समावलेलें आहे. रवींद्रनाथांच्या सर्व तात्त्विक व साहित्यिक विचाराची बैठक ही ईशावास्योपनिषदाच्या सुरवातीच्या ओळींत सांपडते –

ॐ ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्
तेन त्यक्तेन भुञ्जीथा, मागृधः कस्यस्विद्धनम् ॥

हें सर्व विश्व परमेश्वरानें अन्तर्बाह्य व्यापलेलें आहे; जें जें म्हणून या विश्वांत आहे तें तें परमेश्वरानें व्यापलेलें आहे, तें तें त्याचेंच रूप आहे, अशी रवींद्राची दृढ श्रद्धा होती. त्यांची या जगाकडे पाहण्याची दृष्टि आदर्शवादी ( Idealistic ) व आध्यात्मिक ( Spiritualistic ) आहे. या जगांतील प्रत्येक वस्तूवर व घटनेवर, मानवाच्या प्रत्येक अनुभूतीवर मग ती कितीहि क्षुल्लक व साधी असो, भगवंताचा, पूर्णाचा पदस्पर्श उमटलेला आहे अशी त्यांची जिवंत श्रद्धा होती. हें सर्व विश्व प्रभुमय आहे व म्हणून ह्या विश्वाला त्यांनीं आपलें मानून त्याच्याशीं समरस झाले होते व त्याच्या सर्व व्यवहारांत आत्मीयता अनुभवत होते. ही पृथ्वी व हें विश्व मंगल आहे व या विश्वाचा उगम आनंदांतून झालेला आहे, हें विश्व व जीवन आनंदगर्भ आहे व म्हणून जीवनांत आपण दुःखी, कष्टी, निराश, खिन्न असें कधीं राहतां कामा नये; उलट या विश्वाच्या मूलभूत आनंदांत सहभागी होऊन त्याचा आनंद आपणांस प्रतिक्षणीं अनुभवतां आला पाहिजे, अशी रवींद्रांची दृष्टि आहे. व्यक्ति जर आपल्या संकुचित व मर्यादित व्यक्तिमत्वाच्या बंधनांत व सीमांतच गुरफटून राहील तर तिला या विश्वाशीं आपले असणारे प्राणमय संबंध अनुभवतां येणार नाहींत व ही गोष्ट अनिष्ट आहे असें त्यांचें मत आहे.

## रवींद्रांचा धर्म म्हणजे अध्यात्म

रवींद्रनाथांना विश्वाच्या विराटतेविषयीं व अनंतत्वाविषयीं प्रगाढ आदर होता. अनंतता प्रत्येकानें स्वतः अनुभवून आपलें जीवन आनंदमय व कृतार्थ करून घ्यावें असें जरी त्यांचें मत असलें तरी प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं असणारा तिचा आत्म्याचा जो स्फुलिंग त्यासहि त्यांनीं खूप महत्त्व दिलेलें आहे. प्रत्येक व्यक्तीनें आपल्या सर्व कृतींत व विचारांत आपल्या आत्म्याचें मुक्त आविष्करण होईल असेंच वागलें पाहिजे असें त्यांचें मत आहे. मानवी आत्मा हीच जगांत सर्वश्रेष्ठ वस्तु आहे व म्हणून मानवी जीवन हें मानवाच्या आत्म्याचें अकृत्रिम आविष्करण असलें पाहिजे असें रवींद्रांना वाटतें. प्रत्येक व्यक्तीनें आपल्या ठिकाणीं असणाऱ्या सुप्त शक्तींचा व गुणांचा आविष्कार करीत राहिलें पाहिजे व स्वतःचें जीवन मुक्त व स्वतंत्रपणें जगलें







पाहिजे. यासंबंधीं रवींद्रनाथ म्हणतात – " If this individuality is demolished, then though no material be lost, not an atem destroyed, the creative joy which was crystalised therein is gone. We are absolutely bankrupt if we are deprived of this speciality, this individuality, which is the only thing we can call our own; and which, if lost, is also a loss to the whole world. It is most valuable because it is not universal. And therefore only through it can we gain the universe more truly than if we were lying within its breast unconscious of our distinctiveness. The universal is ever seeking its consummation in the unique. And the desire we have to keep our uniqueness intact is really the desire for the universe acting in us. It is our joy of the infinite in us that gives us our joy in ourselves. " ( Sādhanā p. 70 ). रवीन्द्रनाथ म्हणतात कीं प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं वसणारें तें व्यक्तित्व असतें त्याचा जर नाश झाला तर भौतिक दृष्टया जरी कांहीं नुकसान झालें नाहीं तरी या विश्वांतील सर्जनाचा आनंद मात्र नाहींसा होईल. खऱ्या अर्थानें ज्याला म्हणून आपण ' आपलें स्वतःचें ' असें म्हणूं शकूं तें व्यक्तित्व जर आपणांपासून हिरावून घेण्यांत आलें तर आपण पूर्णपणें दिवाळखोर बनूं. व्यक्तित्व हें सर्वव्यापी ( Universal) नाहीं म्हणून तर तें अत्यंत मोलाचें आहे. प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं हें जें असामान्यत्व ( uniqueness ) असतें त्यांत सर्वव्यापी तत्त्व परिपूर्णतेला पोंचण्याचा प्रयत्न करीत आहे. व्यक्तित्वाला मौल्यवान समजून जर आपण त्याची जतन करण्याची आपणांस जी इच्छा असते तीच योग्य आहे; कारण तिच्यांतून तें अनंत तत्त्व आपला आनंद व्यक्तवीत असतें. प्रत्येक व्यक्तीचें हें जें वेगळें व्यक्तित्व ( Individuality ) असतें तें ती ती व्यक्ति अत्यंत मौल्यवान समजते व म्हणून त्यासाठीं व्यक्ति त्याग करावयास व हाल नि दुःखें सहन करावयास तयार होत असते. रवीन्द्रनाथ पुढें म्हणतात– " That this separativeness of self is considered by man as his most precious possession is proved by the sufferings he undergoes and the sins he commits for its sake. It is a constant striving and suffering for us to maintain the separativeness of this self of ours. And in fact it is this suffering which measures its value. ( Ibid. P. 70 ). सर्व विश्वाला व्यापून राहणारें अनंततत्त्व हेंच सर्वांतून जरी व्यक्त होत असलें तरी त्याच्या व्यक्तीकरणाचें प्रत्येक माध्यम तितकेंच महत्वाचें असतें. रवींद्रनाथ म्हणतात कीं अनंततत्त्व सान्तांत शिरून सान्तता पत्करून त्यांतून व्यक्त होण्याची धडपड करतें ही घटना विज्ञानाला विरोधाभासाची व चमत्कारिक वाटते, परंतु ती सत्य आहे. ते म्हणतात– Science refuses to accept the paradox of the infinite assuming finitude - It is a paradox which lies at the root of existence. " ( Personality. p. 55 ) रवीन्द्रनाथ आणखी म्हणतात कीं हें जें अनंत तत्त्व तेंच अद्वैत होय व तें आनंदमय असतें; आणि तें आपल्या मालकीच्या वस्तु अमर्यादपणें वाढविण्यानें समजत नाहीं, तर तें प्रत्येकानें आपल्या अन्तर्यामीं वसतें आहे व तें इतर सर्वांशीं जोडलेलें आहे असा अनुभव घेण्यानेंच समजतें. रवींद्रनाथ म्हणतात– " True spiritual realization is not through augmentation of possession in



अनुक्रमणिका







dimension or number. The truth that is infinite dwells in the ideal unity which we find in the deeper relatedness. This truth of realization is not in space, it can only be realized in one's own inner spirit." ( Personality p. 66 ) अनंताचा साक्षात्कार करून घेणें ही एक प्रकारची आंतरिक परिपूर्णतेची अवस्था असते. अनंत तत्त्वाशीं हें जें ऐक्य साधावयाचें असतें तें बाह्य वस्तु मिळवून साधायचें नसतें तर त्याच्याशीं एकरूपत्व अनुभवून साधावयाचें असतें. म्हणजे व्यक्तीनें आपल्या व्यक्तित्वाचा साक्षात्कार करून घ्यावयाचा असेल तर तिनें भौतिक वस्तूंना प्राप्त करून त्यांचा संग्रह करण्याच्या मागें न लागतां त्या सर्वापेक्षा आपलें व्यक्तित्व मोठें, विशाल व व्यापक आहे असें समजून सर्व व्यावहारिक लाभांच्या व लोभांच्या पलीकडे जावयास पाहिजे. आपल्या व्यक्तित्वाच्या व्यापक अनुभूतीच्या आड भौतिक वस्तु व त्यांवरील प्रेम येत असल्यानें त्या सर्वांच्या पलीकडे जाण्यासाठीं व्यक्तीनें त्यांचा त्याग केला पाहिजे तरच तिला आपलें मूलभूत अनंत स्वरूप समजूं शकेल. म्हणूनच ईशावास्योपनिषद् म्हणतें– " तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्यस्विद्धनम् " । आत्म्याच्या साक्षात्काराच्या आड येणाऱ्या सर्व भौतिक व पार्थिव वस्तूंचा व आसक्तींचा त्याग करा, लोभ धरूं नका, दुसऱ्याचें वित्तहरण करूं नका व त्यागानेंच आपल्या अनंतत्वाचा आनंद उपभोगा, ही ईशावास्योपनिषदाची वाणी रवींद्रांना इतकी आवडली व पटली आहे कीं ती त्यांच्या विचारांचें जणुं केंद्रच बनली. त्यांना सध्यांची भौतिकतेवर व पार्थिवतेवर अवास्तव भर देणारी संस्कृति सदोष वाटते कारण ती माणसाच्या बाह्य व शारीरिक गरजा व उपभोग यांना अवास्तव महत्त्व देते व त्यायोगें त्याच्या आत्म्याचा खोल आवाज दडपून टाकते. ते म्हणतात– "Our needs have multiplied so furiously fast that we have lost our leisure for the deeper realization of our self and our faith in it. It means we have lost our religion, the longing for the touch of the divine in man, the builder of the heaven, the music maker, the dreamer of dreams. ( Religion of man, P. 123 ). माणसाच्या गरजा इतक्या द्रुत गतीनें व इतक्या अफाट वाढल्या आहेत कीं त्यांच्या पुढें त्याला आत्म्याच्या खोल साक्षात्कारासाठीं सवड राहिलेली नाहीं. त्याची आत्म्यावरील श्रद्धा नष्ट झालेली आहे व माणसाच्या ठिकाणीं जें परमेश्वरी तत्त्व वसतें त्याचा प्रत्यक्ष स्पर्श करून घेण्याची त्याला इच्छा उरली नाहीं. त्याची धर्मावरील श्रद्धा लोपली आहे. सध्यांची संस्कृति शारीरिक व भौतिक क्षुधांना अतिरेकी महत्त्व देऊन आत्मतत्त्वाची उपेक्षा करते म्हणून त्यांचा तिला विरोध आहे. रवींद्राचा धर्म म्हणजे अध्यात्म होयं.

रवीन्द्रनाथांनीं या विश्वाला व्यापून उरणाऱ्या सनातन तत्त्वाशीं सदैव मंत्रणा करून त्याच्या स्पर्शाची तीव्र उत्कंठा धरली होती. आपल्या सर्व साहित्य कृतींतून त्यांनीं त्या विराट परतत्त्वाकडेच अंगुलिनिर्देशन केलेलें आहे. या अनंततत्त्वाचें ज्ञान त्यांना अन्तर्ज्ञानानें झालेलें होतें, तर्कानें नव्हे. त्यांनीं आपल्याला त्या परतत्त्वाचा स्पर्श होऊन उत्कट आनंदाची प्रतीति आली असल्याचा उल्लेख आपल्या Religion of man या पुस्तकांत केला आहे. ते म्हणतात – " I have already made the confession that my religion is a poet's religion. All that I feel about it is from vision and not from knowledge. I am sure that there have come moments in my own experience when my soul has touched the infinite and has become intensely conscious of it through the illumination of joy. ( P.







107 ). या विश्वाचें जें मूलतत्त्व आहे तें आनंद-स्वरूप आहे व त्याचा साक्षात्कार संताच्या चिंतनांत व कलावंताच्या कलासर्जनांत होत असतो. सर्व अस्तित्वाविषयीं पराकोटीची उत्कट प्रेमभावना जेव्हां जागृत होईल तेव्हां माणसाला हें ब्रह्म खऱ्या अर्थानें समजेल व तेव्हां त्याला जीवनाचा हा सर्वोत्तम आनंद अनुभवायला मिळेल.

## शांतिनिकेतनांतील शिक्षणपद्धतीचें रहस्य

रवींद्रनाथांनीं स्वतः आपली अशी एक नवीन शिक्षणपद्धति शोधून काढली. तिच्यांत मानवी मनाची केवळ यांत्रिक पद्धतीनें घडण न करतां शिकणाऱ्या लहान व तरुण मुलांमुलींना निसर्गाशीं प्रत्यक्ष व जिवंत संबंध प्रस्थापित करतां येऊन त्यायोगें आपल्या जीवनाच्या मूलभूत तत्त्वाचा साक्षात्कार त्यांना करून घेतां येईल. आणि याच हेतूनें त्यांनीं आपल्या कल्पनेप्रमाणें ‘ शान्तिनिकेतन ’ व ‘ श्रीनिकेतन ’ ह्या संस्था सुरू केल्या. या संस्थांत मुलांचा बाहेरील निसर्गाशीं जितका अधिक संबंध आणतां येईल तितका आणण्याची व्यवस्था केली आहे. तेथें विद्यार्थ्यांचे तास वर्गांतून घेण्याऐवजीं मोठ्या वृक्षांच्या घनदाट छायेंत, जमिनीवर किंवा हिरवळीवर, फुलांच्या, वेलींच्या, पक्ष्यांच्या, मेघांच्या, सूर्यचंद्राच्या व मोकळेपणानें वाहणाऱ्या सुखद वाऱ्यांच्या सान्निध्यांत घेतले जातात. विद्यार्थ्यांना तेथें केवळ पुस्तकी, बौद्धिक व मानसिक शिक्षण न देतां त्यांना हृदयाचें शिक्षण देण्यांत येतें. त्यांना निसर्गाचें स्वतः निरीक्षण करून व निसर्गाशीं प्रत्यक्ष आंतरिक संबंध प्रस्थापित करण्याची व विश्वाशीं एकात्मकता अनुभवण्याची संवय लावण्यांत येते. विद्यार्थ्यांना केवळ यांत्रिक पद्धतीनें शिक्षण घेऊन समाजांत व सरकारांत मानाच्या मोठ्या जागा मिळविण्यास पात्र न करतां त्यांच्या ठिकाणीं वसणाऱ्या सुप्त व अव्यक्त गुण व कौशल्य यांचा पूर्ण विकास करून त्यांना जीवनाची पूर्णता प्राप्त करून घेण्यास समर्थ व उत्तेजित करणें हें शिक्षणाचें कार्य आहे असें रवीन्द्रनाथ मानतात; व त्याच दृष्टीनें शिक्षणक्रमाची आंखणी शान्तिनिकेतनास त्यांनीं केली आहे. शान्तिनिकेतन हें आश्रमाच्या धर्तीवर जन्मास आलें. प्राचीन ऋषींच्या आश्रमाचें व तपोवनाचें पवित्र व मोकळें वातावरण तेथें निर्माण करण्यांत आलें आहे. शान्तिनिकेतनांत विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं रसिकता, कलात्मकता व रसमयता यांची वाढ करण्यासाठीं विविध ललित कलांचें शिक्षण देण्यांत येतें. मानवी मनाचा विकास व आत्म्याचें आविष्करण हें स्वच्छंद कलासर्जनांतून होत असतें. कलेंत मनुष्य परनियंत्रित न राहतां स्वतंत्र असतो व आनंदानें प्रेरित होऊन त्याला जें निर्माण व व्यक्त करावेसें वाटतें तें तो अनिर्बंधपणें व मुक्तपणें करीत असतो, व असें करतांना स्वतःला विसरत असतो. कलानिर्मिति होत असतांना कलावंताला धन्य धन्य वाटत असतें. अशा प्रकारच्या कलेच्या माध्यमांतून तरुण मुलामुलींना स्वच्छंदपणें आपल्या आत्म्याचें व्यक्तीकरण करीत जीवनाचा मुक्त आनंद उपभोगत व त्यायोगें जीवनाचा सर्वांगीण विकास करण्यास योग्य असें वातावरण रवींद्रांनीं आपल्या शांतिनिकेतनांत निर्माण केलें. अशा रीतीनें रवींद्रांनीं विद्यार्थ्यांचा मानसिक, बौद्धिक, कलात्मक व आध्यात्मिक विकास होण्यास अनुकूल असें वातावरण निर्माण करून विद्यार्थ्यांच्या संपूर्ण जीवनाला परिपूर्णतेस नेणारी नवीन शिक्षणपद्धति आपल्या संस्थांत आणली. त्याचप्रमाणें त्यांनीं शान्तिनिकेतनांत प्राचीन भारतीय संस्कृतींतील साधेपणा, आत्मसंयमन, समाधानी वृत्ति व ध्येयसमर्पणता या महनीय जीवनमूल्यांवर भर देऊन कलासर्जनानें ओतप्रोत भरलेल्या वातावरणाला सुद्धां त्यांत रसिकता कायम ठेऊन चैनीचें, अश्लीलतेचें व विलासिततेचें रूप न येऊं देतां सबंध वातावरणांत पावित्र्य व मांगल्य कायम राहील व जीवनांत उदात्ततेचे अनुभव घेतां येतील

असें वातावरण ठेवण्याची दक्षता बाळगली. तेथील विद्यार्थ्यांत त्यांनीं स्पर्धेतून निर्माण होणारी अनिष्ट मानसिक प्रवृत्ति येऊं दिली नाहीं, तर उलट तेथील सर्व अंतेवासीयांच्या ठिकाणीं शांति, प्रेम, सहकार, सहिष्णुता, मनाची व अंतःकरणाची व्यापकता, निसर्ग प्रेम, पावित्र्य व समाधानी वृत्ति ह्या गुणांचा विकास करण्याचा अतुलनीय प्रयोग केला. शांतिनिकेतनांत त्यांनीं उपनिषत्कालांतील तपोवनाचें शांत, रम्य, चिंतनाला पोषक असें वातावरण निर्माण केलें. व्यक्तींच्या अन्तर्यामीं शांति, प्रसन्नता व सुसंवाद ( Harmony ) असावा व जगांतील सर्व व्यवहार परस्पर विश्वास, आदर, प्रेम यांवर आधारलेले असून त्यायोगें जगांत प्रेम, सहकार्य, शांतता व सुसंवाद नांदावा अशी त्यांची दृष्टि होती; आणि जगांत म्हणजे अखिल मानवजातींत असें सहकार्य, प्रेम, सलोखा व शांति आणण्यासाठीं ते आमरण झटले. आणि ह्याच उदात्त हेतूनें प्रेरित होऊन त्यांनीं जागतिक पातळीवर **'विश्वभारती'** या महान् संस्थेची स्थापना केली. जगांतील सर्व भिन्न धर्मांचे, भिन्न संस्कृतींचे, भिन्न वंशांचे, भिन्न भाषांचे व भिन्न राष्ट्रांचे लोक एकत्र यावे व त्यांचें हृदयैक्य व्हावें व अखिल मानवजात एक व्हावी व जगांत संपूर्ण शांतता, ऐक्य, प्रेम व सहकार्य नांदत राहून सर्व मानवजातीची उन्नति होत राहावी ही त्यांची तीव्र इच्छा होती. ती त्यांच्या विश्वात्मकतेच्या भावनेचा एक भाग होता व म्हणून जगांतील सर्व देशांतील भिन्न धर्मांच्या व भिन्न संस्कृतींच्या लोकांना एकत्र येतां यावें, परस्परांच्या विचारांची देवाण घेवाण करतां यावी, परस्परांचें तत्त्वज्ञान, धर्म व संस्कृति यांचा अभ्यास करतां यावा म्हणून त्यांनी विश्वभारती स्थापन केली व विश्वभारतीनें हें कार्य करावें असा त्यांचा हेतु होता. ह्या अवनीतलावर 'विश्वभारती' हें महामानवाचें एक पवित्र तीर्थस्थान व्हावें व तेथें सर्व संस्कृतींचा, धर्मांचा व राष्ट्रांचा परस्पर प्रेम व आदर यांनीं प्रेरित होऊन समन्वय व सुमधुर संगम व्हावा हें रवींद्रांचें महान् व उदात्त स्वप्न त्यांनीं तेथें साकार केलें. 'अविभक्तं विभक्तेषु' हें शांतिनिकेतन व विश्वभारतीचें ध्येयवाक्य आहे.

रवीन्द्रनाथ हे जीवनाचे थोर उपासक होते व विश्वशांतीचे प्रेषित होते. त्यांचें अंतिम ध्येय सत्याचा साक्षात्कार करून घेण्याचें होतें आणि त्यांच्या विश्वात्मक वृत्तीच्या पायावरून त्यांनीं जास्तींत जास्त मोठें ध्येय- महामानवाच्या प्रेममय ऐक्याचें आपलें ध्येय, विश्वभारतीच्या रूपानें साध्य करण्याचा जगांतील अद्वितीय असा प्रयत्न केला. 'शांतिनिकेतन' व 'विश्वभारती' ह्या दोन संस्था रवींद्रांच्या विश्वव्यापी भावनेचीं, प्रेमाचीं, अनंत व शांतता यांवरील प्रेमाचीं जिवंत प्रतीकें होत. विश्वभारतींत त्यांनीं जगांतील भिन्न विचारांचा, संस्कृतींचा व तत्त्वज्ञानांचा समन्वय करण्याचा व विश्वव्यापीभूमिकेवरून मानवजातीचें ऐक्य साधण्याचा जगांतील एक असामान्य प्रयत्न केला.

रवीन्द्रनाथांच्या मतें जो केवळ स्वतःपुरता विचार करतो त्याला फारतर Pleasure सौख्य मिळेल परंतु त्याला शिव Good प्राप्त करून घेतां येणार नाहीं. याबाबतींत ते म्हणतात– "Pleasure is for one's own self but goodness is concerned with the happiness of all humanity and for all time" व्यक्तीनें स्वतःचें लहानसें वैयक्तिक जीवन अनंताशीं समरस करण्यांतच तिला संपूर्ण शिवाची प्राप्ति होऊं शकते. जो अखिल मानवजातीशीं समरस होऊन अखिल मानवांच्या सुखाची व शिवाची चिंता करतो तो साहजिकच स्वतःच्या सुखदुःखाच्या अतीत होतो व त्याला विश्वात्मकता अनुभवाला येतो.










## दु:खांतील सुखाचा शोध

रवीन्द्रनाथांना वैयक्तिक सुख व दु:ख अमान्य होतें असें नाहीं. जीवनांत सुंदर आहे तसें कुरूप आहे, चांगलें आहे तसें वाईट आहे, योग्य तसें अयोग्य आहे हें सर्व त्यांना मान्य होतें. तरीपण जीवनाकडे शुभंकारी दृष्टीनें पाहिल्यास वाईटांतहि चांगलें दिसूं शकेल, वाईटांतहि चांगल्याप्रमाणेंच अनंत परतत्त्वाचा वास असतो असें दिसून येईल असें रवींद्रांना वाटतें. त्यांच्या मतें जीवनांत दु:खेंहि असणारच. जीवनांत दु:ख आहे, अपूर्णता आहे, न्यूनता आहे हें खरें; परंतु दु:खाचेंहि आनंदांत परिवर्तन करतां येणें शक्य आहे व तसें करणें व्यक्तीवर अवलंबून राहतें. वाईटाकडे किंवा अमंगलाकडे मांगल्याच्या दृष्टिकोनांतून पाहिल्यास त्याचें चांगल्यांत परिवर्तन करणें अशक्य नसतें अशी रवींद्रांची श्रद्धा आहे. आणि म्हणून यासंबंधीं जर कोणती गोष्ट लक्षांत ठेवतां येण्यासारखी असली तर ती ही कीं दु:खाचें आनंदांत परिवर्तन करतां आलें पाहिजे. समाधानी वृत्ति वाढवायला पाहिजे. ते आपल्या ' साधनेंत ' म्हणतात- The most important lesson that man can learn from his life is not that there is pain in this world, but that is depends upon him to turn it into good account, that it is possible for him to transmute it into joy." ( p. 63-64 ) त्याचप्रमाणें त्यांनीं आपल्या पत्नीस लिहिलेल्या पत्रांत एके ठिकाणीं म्हटलें आहे — " Try to accept every thing that happens in a calm, quiet and contented manner. It is the only rule that I always bear in mind and try to practise in life. " जें जें कांहीं घडतें तें तें सर्व शांत व समाधानी रीतीनें स्वीकारण्याचा प्रयत्न करावा. मनाची शांतता व समाधानी वृत्ति ढळूं न देतां माणसानें आपणांस आवडणारें श्रेष्ठ कार्य श्रद्धेनें व प्रेमानें करीत राहावें. फळाची आसक्ति व अभिलाषा मनांत न बाळगतां कर्तव्य-बुद्धीनें कामें केलीं, स्वार्थाची इच्छा मनांतून काढून टाकली म्हणजे शांतीनें कार्य करतां येतें. मन:शांति, उदार औदासीन्य ( अनासक्ति ), नि:स्वार्थी प्रेम व निष्काम सेवा यामुळें जीवनाला अर्थ प्राप्त होतो. अन्त:करणांत शांति शोधतां येऊन आपल्या सभोंवतालच्या लोकांस कांहीं सुख व स्वास्थ्य मिळवून देतां आलें तर जीवनाला गौरव प्राप्त होत असतो असें रवीन्द्रनाथांचें मत आहे.

## स्वातंत्र्याचें महान् प्रेम

रवीन्द्रनाथ हे स्वातंत्र्याचे महान् प्रेमी, उपासक व पुरस्कर्ते होते. आत्म्याच्या मुक्त व स्वतंत्र विकासावर त्यांची नितांत श्रद्धा होती. गीतांजलींतील त्यांचें ' Where the mind is without fear and the head is held high ' हें स्वातंत्र्याविषयींचें गीत प्रसिद्धच आहे. मानवाच्या स्वातंत्र्याविषयीं ते आपल्या Religion of Man या ग्रंथांत फारच मार्मिक विवेचन करतांना म्हणतात — " This freedom is a divine gift lent to the mortals who are untutored and undisciplined; and therefore the path of their creative progress is strewn with debris of devastation, and stages of their perfection haunted by apparitions of startling deformities. ...... Every time freedom that we may attain in any direction broadens our path of self realization, which is in superseding the self ...... And freedom in its process of creation gives rise to perpetual suggestions of something further than its obvious purpose. For freedom is for expressing the infinite; it imposes limits in its works, not to keep them in permanence but












to break through them over and over-again, and to reveal the endless in unending surprises. This implies a history of constant regeneration, a series of fresh beginnings and continual challenges to the old in order to reach a more & more perfect harmony with some fundamental ideal of truth(p. 54, 55, 56 ). रवीन्द्रनाथ म्हणतात कीं, असंस्कृत व बेशिस्त अशा मर्त्यांना हें स्वातंत्र्य ही एक दैवी देणगी आहे. लोक असंस्कारी व बेशिस्त असल्यानें त्यांच्या सर्जक प्रगतीच्या मार्गांत नाश, अपव्यय व विकृति हीं पसरलेलीं असतात. व्यक्तींच्या ठिकाणीं शहाणपण नसल्यानें त्यांना निर्मितीचें स्वातंत्र्य असलें तरी त्यांच्या हातून चुकाहि खूप होतात व त्यामुळें बराचसा अपव्यय, नाश, चमत्कारिक, व विकृत स्वरूपाच्या गोष्टीहि त्यांच्या हातून घडतात. असें जरी असलें तरी आपणांस मिळणारें कोणतेंहि स्वातंत्र्य आपल्या आत्मसाक्षात्काराचा मार्ग रुंदावत असतें. आपल्या निर्मितीच्या प्रक्रियेंत स्वातंत्र्य सदैव कांहींतरी नवीन सुचवीत असतें. कारण स्वातंत्र्य हें अनंतास व्यक्त करण्यासाठीं असतें. स्वातंत्र्य हें कृतींवर मर्यादा घालतें ती त्यांना नित्य करण्यासाठीं नसून त्यांचें पुनः पुनः भंजन करून त्यांतून तें अनंताचें स्वरूप अनंत विसयांनीं व्यक्त करतें. ह्याचा अर्थ असा कीं जुन्यांना सदैव आह्वान देऊन सत्याचा मूलभूत आदर्श प्राप्त करून घेण्याच्या इच्छेनें व अधिकाधिक पूर्ण संवाद ( harmony ) निर्माण करण्यासाठीं सदैव पुनरुज्जीवन करीत राहावयाचें. मनुष्य अपूर्ण व अज्ञानी असल्यामुळें तो चुका करणारच, परंतु चुका करीत गेल्यास त्याला आपलें चुकतें कोठें तें समजतें, त्या चुकांतून शहाणपण सुचतें व अधिकाधिक उच्च पातळीवर तो जाऊं शकतो. माणसाला चुका करून त्या चुकांपासून बोध घेऊन शहाणें होण्यासाठीं चुका करण्याच्या स्वातंत्र्याची आवश्यकता असते. मानवाला जी परिपूर्णता गांठावयाची असते तिच्यासाठीं त्याला स्वातंत्र्य असणें ही मूलभूत गरज आहे. मानवाच्या प्रगतीचें व उन्नतीचें स्वातंत्र्य हें गृहीततत्त्व मानलें पाहिजे व म्हणून स्वातंत्र्य ही अत्यंत मौल्यवान् वस्तु समजायला पाहिजे. स्वातंत्र्य हें जीवनाच्या अनिर्बंध व मुक्त आविष्काराचें एक अंग आहे व म्हणून निर्भेळ स्वातंत्र्याचा पुरस्कार रवींद्रनाथ आपल्या हयातीभर करीत राहिले. स्वातंत्र्य व निर्भेळ स्वच्छंद आत्मदर्शन हे जणुं समानार्थी शब्दच होत. मानवी आत्म्याचें व त्याच्या सर्जक प्रगतीचें स्वातंत्र्य टिकविण्यासाठीं मानव अनादिकालापासून सर्व बंधनें व शृंखला यांच्याविरुद्ध बंड उभारूनलढा देत आलेला आहे; कारण त्याला आत्मस्वातंत्र्य ही सर्वांत मौल्यवान् वस्तु व मूल्य वाटत आलेलें आहे. रवीन्द्रांची ही स्वातंत्र्यप्रेमी विचारसरणी सध्यांच्या लोकशाहीच्या विचाराला खूपच पोषक ठरली आहे यांत शंका नाहीं.

## जीवनाचे भाष्यकार

रवीन्द्रनाथ कवि होते, कलावंत होते, साहित्यिक होते, तत्त्वज्ञ होते हें सर्व जरी खरें असलें तरी ते खरें म्हणजे अखंड जीवनाचे, उच्च आध्यात्मिक आदर्श जीवनाचे एक महान् भाष्यकार होते. ते एक द्रष्टे व जीवनदर्शी ऋषि होते. त्यांच्या साहित्याच्या विविध प्रकारांत त्यानीं सर्वत्र विचारांचा एकच धागा, आदर्शाची एकच बैठक टिकविली आहे व ती म्हणजे मानवी आत्म्याचें अकृत्रिम, स्वच्छंद आविष्करण व आत्म्याची पूर्णतेकडे सतत चालणारी प्रगति. रवीन्द्रनाथ हे जात्याच विश्वात्म प्रवृत्तीचे प्रेमी असल्यानें त्यांच्या सर्व विचारांत एक प्रकारच्या समन्वयाची ( Synthesis ) दृष्टि व्यक्त झालेली आहे. त्यांनीं प्राचीन भारतीय संस्कृतींतील उच्च आध्यात्मिक आदर्श व अर्वाचीन संस्कृतींतील भौतिक व पार्थिव समृद्धि, जुनें व नवें, पौर्वात्य व











पाश्चिमात्य यांचा अनुपम संगम व समन्वय आपल्या विचारांत घडविण्याचा प्रयत्न केला. ते अध्यात्माचे प्रेमी असले तरी त्यांनीं भौतिकाचा त्याग व तिरस्कार केला नाहीं. उलट भौतिकांत व पार्थिवांतहि त्यांनीं प्रभूस अनुभवण्याचा प्रयत्न केला. त्यांचें अध्यात्म व धर्म हे विश्वाच्या मुळांशी असलेल्या विस्मयाचा ( Mystery ) शोध लावणें व त्याचें स्वरूप समजून घेणें हेच होत. त्यांच्या मतें हें विश्व म्हणजे अनंत आत्मतत्त्वाची स्वच्छंदी लीला होय. उपनिषदांनीं वर्णिलेले आध्यात्मिक आदर्श हे खरोखरच महान् असून शेवटीं सर्व जगानें त्याच मार्गानें मार्गक्रमण व प्रगति केली पाहिजे अशी त्यांची श्रद्धा होती, व म्हणून ते पाश्चिमात्य संस्कृतीनें निर्मिलेल्या भौतिक समृद्धीच्या तेजानें दिपून व बावरून गेले नाहींत. उलट मानवी आत्मज्ञानाचा, आत्मसाक्षात्काराचा व आत्मपूर्तीचा आदर्श हाच सर्वश्रेष्ठ होय व तो पाश्चिमात्यांनींहि स्वीकारावा असें प्रतिपादन केलें, व ह्या आदर्शाचा प्रसार करणें हें ते आपलें जीवितकार्य समजले. सन १९१६ सालीं शिकागोहून त्यांनीं आपल्या मिरूस ( मुलीस ) लिहिलेल्या पत्रांत ते म्हणतात – "The bounds of my country have disappeared for me. I must unite all countries into one within my heart, before I have my release. There is a connection between my name and work. My life commenced on the eastern horizon and will terminate at the western horizon." रवींद्रांची अशी दृढ श्रद्धा होती कीं त्यांचे विचार व साहित्य हीं केवळ भारतीयांसाठीं नव्हतीं. आपण व आपले विचार सर्व मानवजातीसाठीं आहेत अशी त्यांची समजूत होती. त्यांचा संदेश सर्व जगासाठीं होता. त्यांच्यासमोर केवळ मर्यादित भारत नव्हता, तर त्यांच्या अंतःकरणांत सर्व देश एक झाले होते. त्यांनीं म्हटल्याप्रमाणें त्यांचें नांव ( रवि ) व त्याचें कार्य यांच्यांत निकटचा संबंध होता. त्यांच्या जीवनाला ( रवीला ) पूर्वक्षितिजावर प्रारंभ होऊन तें शेवटीं पश्चिम क्षितिजावर अस्ताला जाणार होतें. त्यांनीं आपलें बरेचसें साहित्य बंगालींतून इंग्रजींत आणलें तें कशासाठीं ? जगांतील सर्व लोकांना समजावें म्हणूनच ना ? आपल्या आवडत्या ध्येयांचा प्रसार करण्याचें कार्य जणु ईश्वरानें त्यांच्यावर सोंपविलें होतें व परमेश्वरी प्रेरणेनें ते आपलें कार्य त्रास व हालअपेष्टा सोसून करीत होते. त्यांनीं आपल्या पत्रांत लिहिलें आहे, "He who has built me up all these years, amidst pleasures and pains, so that he may make use of me; He will himself guide me and employ me, in the service not of my country but of his world. So it is not my desting to remain quietly in seclusion" अशारीतीनें रवीन्द्रनाथ ईश्वरप्रेषिताप्रमाणें ईश्वरदत्तकार्य करण्यासाठीं जगत होते व अखिल मानवजातीस प्रेम व शांति प्रदान करण्यांत त्यांना आपल्या जीवनाची कृतार्थता व इतिकर्तव्यता वाटत होती. त्यांनीं या कार्यासाठीं आपलें जीवन प्रभूस समर्पण केलें होतें व त्यांच्याकडून होणारीं कामें जणु परमेश्वर स्वतःच त्यांच्या करवीं करवून घेत होता. आपण परमेश्वराच्या हातांतील जणुं एक साधन आहों, वेणु आहोंत व तो आपल्यांतून त्याला आवडणारे सूर आळवीत आहे अशी त्यांची भावना होती.

हें सर्व विश्व अन्तर्बाह्य चिन्मय ब्रह्मानें किंवा सनातन आत्मतत्त्वानें व्यापलेलें आहे व सर्वत्र प्रभूच भरून राहिला आहे अशी रवींद्रनाथांची धारणा होती. "जेथें देखें तेथें तुझींच पावलें । सर्वत्र संचरलें रूप तुझें ।" अशी त्यांची जिवंत अनुभूति होती. जळीं, स्थळीं, पाषाणीं–सर्वत्र अणुरेणूंत प्रभूचें वास्तव्य असल्याचा अनुभव त्यांना येत होता.

'ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्'. हें विश्व प्रभुमय, प्रभुव्याप्त आहे व 'सर्व विश्वावर त्याचा पदाकार' अशी त्यांची श्रद्धा होती. " प्रभुमज आला, भेटायाला। चराचरीं जो भरुनी उरला " असा अनुभव त्यांना सदासर्वकाळ व सर्वत्र येत असे. उपनिषदांतील ऋषींनीं उत्स्फूर्त होऊन जे भव्य उद्गार काढले ते त्यांनीं स्वतः प्रत्यक्ष अनुभवण्याचे प्रयत्न केले. पद्मा व गंगा-नदीच्या पात्रावर, बोलपूरच्या घनवनराईत, बंगा-लच्या सतत वर्षणाऱ्या जलधारांत, हिमालयाच्या शुभ्र शिखरांच्या परिसरांत, शुभ्रश्यामल मेघांतरांत, सागराच्या विस्तीर्ण जललहरींवर व फेनांत, स्वैर-पणानें अष्टदिशांत वाहणाऱ्या समीरांत सर्वत्र त्यांना प्रभूचीं पावलें दिसलीं व त्याचा पदरव ऐकूं आला. त्यांना निसर्ग फारच आवडत असे. असें हें सुंदर जग त्यांना शुभ, पवित्र व मंगल वाटत असे. त्यामुळेंच त्यांना अखिल मानवजातीविषयीं उत्कट प्रेम वाटे. ही विश्वात्म होण्याची वृत्ति त्यांना जन्म-जात मिळाली होती, शिक्षणानें नव्हे. त्यांना अन्त-र्ज्ञानानें विश्वाच्या विराट एकात्मतेचें व अनन्तत्वाचें जिवंत दर्शन घडलें होतें. त्यामुळें त्यांना सबंध मानवता व जग एक वाटे. जगांतील विविध राष्ट्रांत व मानवांत देश, वंश, धर्म, भाषा व संस्कृति यांच्यामुळें जे भेद पडले आहेत ते त्यांना काल्पनिक, कृत्रिम, मिथ्या व अयोग्य वाटत. त्यांना सबंध मानवजात एक वाटे व तीहि परमात्म्याच्या भूमिकेवरून.

रवींद्रनाथ हे खरे जातिवंत मानवतावादी (Humanist) व आंतरराष्ट्रीयवादी (Internationalist) होते; पण त्यांच्या या भूमिकेचा पाया अध्यात्म होता. ते सर्वात्मवादी असल्यानें त्यांना या जगांत व विश्वांत, मानवांत व मानवेतर सृष्टींत परकें (alien) असें कधीं वाटलें नाहीं. त्यांना सर्वत्र अन्तर्बाह्य एकमेव सच्चिदानंदस्वरूपी अनंत आत्मतत्त्व भरल्याचा मधुर अनुभव येई. त्याच एका आनंदानें त्यांचें जीवन अन्तर्बाह्य उजळून निघालें होतें. त्याच जीवनानंदानें ते सदैव भारलेले होते व तोच विश्वानंद त्यांच्या जीवनाचा, विचाराचा, काव्याचा, कलेचा व साहित्याचा स्थायीभाव होता.

रवीन्द्रनाथांनीं विसाव्या शतकांत उपनिषत्कर्त्या ऋषींची पवित्र व मंगल अध्यात्मवाणी भारतांत व जगांत घुमविली. तेच पावित्र्याचें व मांगल्याचे सोज्वळ ध्वनि त्यांनीं भौतिकतेनें व शारीरिक सुख-विलासांनीं, गजबजलेल्या आधुनिक जगांत ऐक-विले व केवळ शारिरीक सुखोपभोगांवर, मानसिक विचारांवर व बुद्धिप्रामाण्यावर चाल-लेल्या या जगास त्या सर्वांना व्यापून उरणारे पण या सर्वांच्या अतीत असलेल्या महान् आत्म-तत्त्वाचें दर्शन घडविलें. भौतिकता, पार्थिवता वैष-यिकता, स्वार्थ व लोभ यांनीं पीडित अशा मानव-तेवर रवींद्रनाथांनीं आपल्या शुभंकारी दृष्टीनें मांग-ल्याची फुंकर घालून तिला अध्यात्माच्या उच्च पात-ळीवर नेण्याचा महान् प्रयत्न केला. भौतिकतेनें पछाडलेल्या यांत्रिक व औद्योगिक पाश्चिमात्य संस्कृ-तीच्या विलासानें दिपून व बावरून न जातां या विश्वाच्या बुडाशीं असलेल्या व या विश्वाला व्यापून राहणाऱ्या आनंदरूप आत्मतत्त्वाची श्रेष्ठता व आव-श्यकता रवींद्रांनीं प्रतिपादन करून त्या परतत्त्वाला त्याच्या मूळ उच्च स्थानावर विराजमान करण्याचें व मानवी आत्म्याची होणारी अवहेलना थांबवून त्याला आपली सर्वश्रेष्ठ प्रतिष्ठा प्राप्त करून देण्याचें व मान-वतेस मांगल्याचा पथ दाखविण्याचें जें लोकोत्तर कार्य केलें त्याबद्दल या महाकवीला व थोर जीवन-योग्याला केवळ भारतच नव्हे तर अखिल जग कृतज्ञतेनें वंदन केल्याशिवाय राहणार नाहीं. भार-ताला असा हा लोकोत्तर महान् सुपुत्र लाभला व त्यानें भारतीय संस्कृतीचा मंगल संदेश जगभर पस-रविला हें भारताचें सद्भाग्यच समजायला पाहिजे.

---








प्रा. सिडने हूक् अनुवाद : अशोक शहाणे

# उर्वरित कार्ल मार्क्स

( Tamiment Institute मध्यें वाचल्या गेलेल्या प्रा. सिडने हूक् यांच्या भाषणावरून कलकत्त्याच्या Institute of Political £ Social Studies ह्या संस्थेनें प्रकाशित केलेल्या what is left of Karl Marx लेखाचा हा सलग अनुवाद ).

मार्क्सवादापैकीं काय जिवंत राहिलें आहे व काय मरून गेलें आहे, याची चर्चा ह्याना त्या प्रकारें मी चाळीस वर्षें ( वयाच्या सोळाव्या वर्षापासून ) करत आलों आहे. स्वतःला मार्क्सवादी म्हणवून घेणें किंवा न घेणें, हें मीं मार्क्सवादाच्या व्याख्येवर अवलंबून ठेवलें होतें. कधीं कुणी मला 'आपण मार्क्सवादी आहांत काय ?' असा प्रश्न विचारला, कीं मग प्रश्नकर्त्यानें मार्क्सवादाची मला समजेलशी व्याख्या करतांच ताबडतोब होकारार्थी किंवा नकारार्थी काय—तें उत्तर देण्याचें वचन मी देत असे. अशा बाबतींत मग उत्तर देण्याचा प्रसंग माझ्यावर क्वचितच ओढवत असे. आणि दोन किंवा जास्ती व्यक्ति जर तिथें असल्या, कीं मग पाह्यलाच नको. मार्क्सवाद ही काय चीज असावी, ह्यावर त्यांचें आपसांत कधींच एकमत झालें नाहीं.

परंतु स्वतंत्रपणें लिहितांना, मार्क्सच्या विचारांच्या माझ्या समजुतीनुसार, कित्येकदां मी स्वतःचा उल्लेख एक मार्क्सवादी म्हणून करत असे. पण तें मीं कांहीं काळापूर्वींच सोडून दिलें. कारण टीकाकार म्हणायला लागले, कीं तुमचें जर बरोबर असेल तर मग सबंध जगाच्या पाठीवर तुम्ही एकटेच काय सच्चे मार्क्सचे चेले अस्तित्वांत आहांत - अन् तेंहि निव्वळ आतांच नव्हे, तर सबंध इतिहासांत. एकच मार्क्सचा सच्चा चेला ! हें एकंदरींत मला अशक्यच वाटलें. पण असा उतावळेपणा करायला नको. कारण अशक्य, असंभाव्य गोष्टीच कधींकधीं खऱ्या असतात. मॅक्स ईस्टमननें एकदां माझ्या मार्क्सवरच्या पुस्तकाचें परीक्षण लिहिलें आणि त्याला शीर्षक टाकलें : 'कार्ल मार्क्स जॉन डयुईचा विद्यार्थी असता, तर तो असें म्हणाला असता'— मीं त्याला उत्तर दिलें : 'मॅक्स ईस्टमनला खोडून काढण्याकरतां कार्ल मार्क्स असें म्हणाला.' पण स्वतःचा मार्क्सवादी म्हणून उल्लेख करणें सोडून देण्याकरतां एक अधिक वजनदार कारणहि होतें : मार्क्स समजूं शकणारे आपणच तेवढे एकुलते एक आहोंत, असें असण्यांतला एक वरवरचा उद्धटपणा. आपल्या एकुलत्या एक समजदारपणाची गोष्ट खरी असली, तरी हें कांहीं जात नाहीं. जी. डी. एच्. कोल यांची अशी एक चमत्कारिक कल्पना होती, कीं आपणहि पण एकटेच मार्क्सला अस्सल समजूं शकलों आहोंत. म्हणजे जसे कांहीं आम्ही दोघेंहि असे एकुलते एक असूं शकूं !

आतां गंभीरपणें ह्या समस्येकडे वळायचें, तर स्वतःचा मार्क्सवादी म्हणून उल्लेख करणें मीं बंद केलें, त्याचें खरें कारण म्हणजे कम्युनिस्टांनीं हाताळलेले मार्ग, त्यांचीं ध्येयें, त्यांच्या श्रद्धा – ह्या साऱ्यांचा गुंतवळा लोकांना 'मार्क्सवादी' शब्दानें अभिप्रेत होत असे आणि परत कम्युनिस्ट लोक स्वतःला लढाऊ नि कर्मठ मार्क्सवादी म्हणवून घेत होते. मग मी स्वतःचें सांत्वन केलें. म्हटलें, जाऊं दे; शेवटीं कार्ल मार्क्सनें स्वतःच आपण मार्क्सवादी असल्याचें अमान्य केलें होतें. आणि मार्क्स स्वतः जर आपल्याला लोक मार्क्सवादी समजतात किंवा नाहीं, याबद्दल इतकी फिकीर बाळगत नव्हता, तर आपण एवढी चिंता कां बाळगावी ?

तें कांहींहि असो. मी ह्या प्रश्नाकडे पाहतों, तें मार्क्सचा एक विद्यार्थी म्हणून पाहतों. आणि मार्क्सचा विश्वास होता असें सामान्यतः मानल्या जाणाऱ्या कल्पना कितपत व्यवहार्य आहेत, त्याची चर्चा मी








करणार आहे. ह्या कल्पना समाजवाद सिद्ध करण्या-विषयींच्या तत्त्व व आचाराबद्दलच्या आहेत. आपण मार्क्सवादी आहोंत, हें जरी मार्क्सनें नाकबूल केलें; तरी आपण समाजवादी आहोंत, हें त्यांनीं कधींच नाकारलें नाहीं. तसेंच, मार्क्सचे आर्थिक तत्त्वविचार, ऐतिहासिक आधिभौतिकवादाचें त्याचें तत्त्व, वर्ग, वर्गविग्रह आणि शासनसंस्था या विषयींच्या त्याच्या कल्पना– यांचीहि चर्चा मी करणार आहें.

मार्क्सनें आधीं इतिहासाची तत्त्वप्रणालि रेखाटली, समाजवादाकडे नेणारा मार्ग आंखला व नंतर त्यानें आपल्या अर्थशास्त्रीय कल्पनांचा विकास केला, ही गोष्ट तर सर्वांना चांगलीच माहित आहे. भांडवलशाहीच्या अनुषंगानें होणाऱ्या विकासाचे नियम शोधून काढण्याचा प्रयत्न करत असतांना त्यानें वस्तूंचें उत्पादन करणाऱ्या समाजाच्या अर्थशास्त्राचें विश्लेषण लोकांपुढें ठेवलें. ह्या विश्लेषणाप्रमाणें, उत्पादनाच्या सामर्थ्याचा विकास उत्पादित वस्तूंकरतां बाजारपेठच न राहण्याइतक्या बिंदूपर्यंत पोंचला, कीं आपल्या ह्या अफाट यशामुळेंच भांडवलवादाचा नाश ओढवेल; त्यामुळें परिणामतः येणाऱ्या उत्तरोत्तर वाढत्या मोठ्या प्रमाणावरील बेकारीमुळें दरिद्री-करणामुळें आणि न भागलेल्या भुकेमुळें ही सबंध यंत्रणाच कोसळून पडेल. अशी ही परिस्थिति प्रोलेटेरियन क्रांतीची प्रस्तावना असेल आणि माणसाचें माणसाकडून होणारें शोषण संपविणाऱ्या कलेक्टिव्हिस्ट समाजाची ती संक्रमणावस्था असेल.

भांडवलवादाच्या विकासाविषयीं नंतर खऱ्या ठरलेल्या पुष्कळ गोष्टी मार्क्सनें सांगितल्या होत्या. औद्योगिक केंद्रीकरणाची प्रवृत्ति, भांडवलाची साठेबाजी, मक्तेदारीची वाढ आणि मोकळ्या बाजारपेठांचें संकुचन-अशा कित्येक गोष्टी त्यानें द्रष्टेपणानें पाहिल्या होत्या. व्यवहारोपयोगी शास्त्र बाल्यावस्थेंत असतांनाच, तंत्रशास्त्रांचा उद्योगधंद्यांवर व शेतीवर होणारा प्रचंड परिणाम त्यानें अचूक ताडला होता. श्रमिकांची व श्रमिक संघटनांची वाढ आणि व्यापारी रहाटगाडग्याचें अबाधित अस्तित्व– हेंहि भाकित त्यानें केलें होतें. ह्या यादींत आणखी कितीतरी मुद्दे घालतां येतील आणि तपशीलांत जरी ते चुकीचे ठरले, तरी मार्क्सला आर्थिक क्षेत्रांत आश्चर्यकारक नजर होती, हें त्यामुळें सिद्ध होईल.

परंतु हीं भाकितें, बहुशः आर्थिक तत्त्वप्रणालीचा विकास घडवून आणण्याआधीं केलेलीं असल्यानें, मार्क्सच्या मूल्यविषयक विचारांचा फायदा त्यांना उठवतां आला नाहीं– आणि मार्क्सचे मूल्यविषयक विचार हें त्याचें सर्वांत संपन्न विचारभांडार होतें. शिवाय, त्याच्या विचारांतून निघणारे निष्कर्ष तर्कसंगत भाकितांशीं मुळींच जुळणारे नव्हते.

त्याहून महत्त्वाची गोष्ट अशी, कीं भांडवलवादानें, मरायचें तर राहोंच पण, साधें कोलमडण्याचेंहि नांवच काढलें नाहीं. नव्या उद्योगधंद्यांचा विकास होत राहायला, नवीन उत्पादनें निघतच राहिलीं आणि नव्या आर्थिक गरजाहि उपस्थित होत राहल्या. मध्यमवर्ग नष्ट झाले नाहींत किंवा दरिद्रीकरण उत्तरोत्तर वाढलें नाहीं. उलट मध्यम वर्गानेंहि विकास साधला आहे, आणि दरिद्रीकरण उत्तरोत्तर कमीच झालें आहे. दारिद्र्य हा एक सापेक्ष शब्द आहे, परंतु आर्थिक दुर्दशा हा तसा नाहीं. आज, ह्या घडीला, देशांत चाळीस लक्ष बेकार असतांना आणि कित्येक कुटुंबें वार्षिक एक हजार डॉलर्सपेक्षांहि कमी मिळकतीवर जगत असतांना भांडवलवादानें आर्थिक दुर्दशेची समस्या सोडवली आहे, असें मी मुळींच मानत नाहीं. परंतु बहुतांश पाश्चिमात्य देशांत आढळून येणारें भांडवलवादाचें चित्र मार्क्सच्या आर्थिक विश्लेषणावरून होणाऱ्या आपल्या अपेक्षेपासून इतकें प्रचंड निराळें आहे, कीं आणली मार्गदर्शनाकरतां हें विश्लेषण निष्फळ आहे. भांडवलशाही देशांत करण्यांत येणाऱ्या आर्थिक अंदाजांत शास्त्रीय शिस्त व नियमन ज्या प्रमाणांत आहे, त्या प्रमाणांत तें अर्थशास्त्र मार्क्सपेक्षां केन्सवरच अवलंबून राहतें — आणि आपल्या आर्थिक विचारावर मार्क्सचा प्रभाव असल्याच्या आरोपाचा खुद्द केन्सनेंच इन्कार केला होता.

मार्क्सचीं भाकितें खोटीं कां ठरलीं, ह्याची कारणमीमांसा करण्याइतका वेळ मला नाहीं. परंतु थोडक्यांत सांगायचें तर आपल्या 'राजकीय अर्थव्यवस्थे' ज्या शास्त्रावर 'राजकीय अंशां' चा, करभारांच्या –– विशेषतः कम्युनिस्ट मॅनिफेस्टोंतल्या मागण्यांच्या यादींत अंतर्भूत झालेल्या वाढत्या मिळकत-कराच्या–












सामर्थ्याचा, तुटीच्या अर्थकारणाच्या सामर्थ्याचा, ट्रेड युनिअन्सच्या सामर्थ्याचा, आणि शास्त्रीय शोधाच्या सामर्थ्याचाहि प्रभाव मान्य करण्यांत त्यानें भयंकर अपयश पदरीं पाडून घेतलें.

ऐतिहासिक आधिभौतिकवादाचें तत्त्व हें कदाचित् मार्क्सच्या तत्त्वप्रणालींतलें सर्वांत अधिक प्रभावशाली तत्त्व आहे. मार्क्सवादी नसलेले कित्येक इतिहासकारहि एक उपयुक्त संशोधनात्मक पद्धति म्हणून तिचें ऋण मान्य करतात. बटरफील्डसारखा ख्रिश्चन इतिहासकार सुद्धां 'मार्क्सवाद्यांनीं आपल्या सर्वांच्या इतिहासविषयक विद्वत्तेंत-मार्क्सवादी नसलेल्यांना मान्य करणें परवडेल त्यापेक्षां कितीतरी अधिक—भर टाकली आहे' असें लिहितो ( Christianity and History, पा. ६० ). आणि ह्या ऐतिहासिक आधिभौतिकवादाचें निरूपण जर वस्तुनिष्ठपणें केलें, तर ही प्रणाली युरोपियन भूतकाळावर इतर कोणत्याहि ऐतिहासिक प्रणालीपेक्षां अधिक प्रकाश टाकूं शकेल, असें मला वाटतें.

पण इतिहासांत प्रयोग करून दाखवण्याजोगें जर कांहीं असेल, तर मार्क्सनें आपली प्रणाली ज्या स्वरूपांत वापरली आणि त्या आधारें भाकितें केलीं ती प्रणाली आपल्या काळाला लागू केली, तर ती तोकडी किंवा खोटी ठरेल, याबाबत मला शंका नाहीं. आणि गमतीची वस्तुस्थिति अशी कीं, स्वतःला आत्यंतिक कर्मठ मार्क्सवादी म्हणवणाऱ्यांनींच—मार्क्सवाद्यांनींच—ती धुडकावून लावली आहे. सामाजिक बदलाची दिशा आणि समाजांतल्या राजकीय आणि सांस्कृतिक सांगाड्याचें स्वरूप हें ठरविण्यांत आर्थिक उत्पादनाचा प्रकार हा निर्णायक असतो, असें प्रतिपादन ऐतिहासिक आधिभौतिकवाद करतो, हें सर्वांनाच माहित आहे. भांडवलवादाच्या वस्तु-उत्पादनाचे संबंध जेव्हां अतिशयित पराकोटीला विस्तारित होतील, तेव्हांच आणि तेथेंच समाजवाद आरंभिला जाईल, असें भाकित मार्क्सनें केलें होतें. 'वाव असलेल्या सर्व उत्पादक शक्तींचा विकास घडून आल्याखेरीज कोणतीच समाजव्यवस्था नष्ट होत नाहीं.' पण तरी १९१७ मध्यें, जेव्हां बोल्शेविकांनीं राजकीय सत्ता काबीज केली, तेव्हां रशिया हा आर्थिकदृष्ट्या मागसलेला देश होता, —त्यांतला भांडवलवाद खुरटाच वाढला होता. रशियांत घडून आलेले राजकीय बदल ही ऐतिहासिक आर्थिक शक्तींची स्वाभाविक निष्पत्ति नव्हती, तर कम्युनिस्टांची अदम्य इच्छाशक्ति व लेनिन-ट्रॉट्स्की यांची राजकीय प्रतिभावत्ता व उन्मत्तता यांची निष्पत्ति होती. राजकारण आणि आदर्शवाद हे तिथें आधींच्या आर्थिक विकासांत पडलेली भर व वर उभारलेली रचना म्हणून आले नाहींत, तर स्वतःच जगांतील अगदीं अभावित स्थळीं एक सामाजिक अर्थव्यवस्था उभारण्याला कारणीभूत होऊन बसले. तिचा विकास व्हावा, अशी अपेक्षा मार्क्सनें बाळगली होती.

रशियाबाबत जें काल खरें होतें, तेंच चीनबाबत आज खरें आहे. आणि १९१७ सालीं रशिया आर्थिकदृष्ट्या जेवढा मागसलेला होता, त्याहिपेक्षां चीन आज अधिक मागसलेला आहे.

रशियांतली ऑक्टोबर क्रांति आणि जगभर आंतरराष्ट्रीय चळवळीची सुसूत्रता, यामुळें सबंध जगांत कम्युनिस्ट नसलेल्या राष्ट्रांच्या अस्तित्वालाच धोका निर्माण होण्याची प्रतिक्रियेची सांखळी सुरू झाली. यामुळें आणखी कम्युनिस्ट राष्ट्रांना वळवण्याकरतां व तटस्थ राष्ट्रें गिळलीं जाऊं नयेत, म्हणून घेतलेल्या आर्थिक हालचाली सुरू झाल्या. ह्या सर्व हालचाली मुख्यत्वेंकरून राजकीय हेतूंमुळें करण्यांत येतात. यावरून असें म्हणतां येईल, कीं इतिहासाच्या ह्या आपल्या काळांत निर्णायक शक्ति आर्थिक उत्पादनाच्या प्रकारांत राहिलेली नसून, राजकीय निर्धाराच्या प्रकारांत सामावलेली आहे. हें अशा अर्थानें, कीं आर्थिक उत्पादनाच्या प्रकाराच्या विकासांतील मानल्या गेलेल्या गरजांच्या आधारापेक्षां, कृतीच्या राजकीय उद्दिष्टांच्या आधारावर राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतल्या —आर्थिक उपाय योजनाहि यांत आलीच— अधिक गोष्टी आपण समजूं शकतों, स्पष्ट करून सांगूं शकतों, त्यावर अंदाज बांधूं शकतों. अर्थकारणापेक्षां राजकारण हीच संस्कृतीच्या इतर पैलूंची प्रधान ( एकुलती एक मात्र नव्हे ) किल्ली बनली आहे, अशा जगांत आज आपण राहतों. आणि जग संपूर्णपणें स्वतंत्र किंवा संपूर्णपणें totalitarian बनेपर्यंत हें असेंच राहणार.






अनुक्रमणिका





Totalitarianism च्या उल्लेखानें आठवण झाली : रशियांत समाजवादी अर्थव्यवस्था उभारली गेली आहे किंवा चीनमध्यें ती उभारली जाईल, याचा इन्कार कांहीं मार्क्सवाद्यांनीं केला आहे. सार्वत्रिक औद्योगीकरणासाठीं आवश्यक असलेल्या भांडवलाची प्राथमिक जमवाजमव करण्याकरतां आर्थिक मागसलेपणामुळें मानवी श्रमांचा जास्तींत जास्त फायदा उठवणें अत्यावश्यक असल्यामुळेंच नेमकी एक नवी वर्गपद्धति निर्माण झाली आहे–ही वर्गपद्धति समाजवादी आदर्शांचा अविभाज्य घटक असलेल्या लोकशाही तत्त्वांची पायमल्ली करून त्यांना नष्ट करत असते. ह्या मताप्रमाणें मार्क्सच्या कल्पनांनीं त्यांच्या विश्वासघातक्यांवर सूड उगवून घेतला आहे. असें कां व्हावें ? इतिहासदृष्ट्या अपक्व परिस्थितींत समाजवाद उभारण्याचे प्रयत्न केल्याचा परिणाम म्हणून नव्या स्वरूपांत जुन्याच भांडवलवादाचीं पापकर्मे आणि पूर्वींच्या कशाहिपेक्षां अधिक पाशवी व अवनतिकारक अशीं नवीन पापकर्मे परत त्यांत आलीं. ह्या अर्थानें मार्क्सवादानें आपला सूड उगवला आहे, असें म्हटलें जातें. कारण कर्मठ मार्क्सवाद्यांचीच भाषा वापरायची तर–ऐतिहासिक आधिभौतिक वादाचे नियम उपेक्षिले, कीं समाजवादाची उभारणी करणें अशक्य असतें, असें ह्या गंभीर परिणामांवरून दिसून येतें.

चर्चेकरतां म्हणून आपण हा मुद्दा मान्य करूं या. लोकशाहीविना समाजवाद हा मुळीं समाजवादच नव्हे आणि आर्थिक परिस्थिति अपक्व असलेल्या देशांत तो आणण्याकरतां केलेले कोणतेहि प्रयत्न अयशस्वीच ठरणार. परंतु तरीसुद्धां ह्यामुळें मूळ प्रणालीला जीवदान मिळत नाहीं. प्रयत्न निष्फळ ठरतील असें भाकित तिनें कदाचित् केलें असेल, पण प्रयत्न केला जाईल असें भाकित तर तिनें केलें नाहींच. आणि प्रयत्न व प्रयत्नाचे परिणाम यामुळें निर्माण झालेल्या घटनांच्या सांखळीलाच आपण 'प्रणाली' म्हणतों. खरें म्हणजे यांतून परत तो एकच निष्कर्ष निघतो- समाजवादाची व्याख्या कशीहि केली, तरी आपलें जग आज प्रामुख्यानें अशक्य गोष्ट सिद्ध करण्याच्या ( आर्थिक दृष्ट्या मागसलेल्या देशांत समाजवाद आणण्याच्या ) घटनेनें बनलें आहे आणि ह्या प्रयत्नाचें ( स्वतःचा इतिहास स्वतः घडविण्याचें ) स्पष्टीकरण मार्क्स देत नाहीं.

जातां-जातां फक्त उल्लेख तेवढा करतों : मार्क्स आणि ऐतिहासिक आधिभौतिकवादाचे तत्त्व फॅसिझमूच्या उदयाचें पटेल असें कांहीं स्पष्टीकरण देऊं शकत नाहींत. मार्क्सला फॅसिझमच्या उदयाचें भाकितहि करतां आलें नाहीं आणि भांडवलवाद व समाजवाद ह्या रूढ परिभाषेंत फॅसिझमचें वैशिष्ट्यहि सांगतां येत नाहीं.

आर्थिक वर्गविग्रहाच्या मार्क्सच्या सिद्धांताबद्दल अधिक खूप सांगतां येईल. संघर्षांत येणारीं आर्थिक वर्गउद्दिष्टें व त्यांवर आधारित वर्गविग्रह अस्तित्वांत आहेत, असें मी अजून मानतों. पण आर्थिक वर्गविग्रहच तेवढे अस्तित्वांत आहेत, असें नाहीं. इतर अनेक प्रकारचे वर्ग किंवा गटविग्रह चालू आहेत, आणि वर्गांतील भांडणेंच निव्वळ नव्हेत, तर हिटलरसारख्याला विरोध करतांना किंवा ग्राहकाच्या खिशावर ताण पाडून मजूर नि मालक जेव्हां भाववाढ करण्यावर एकमत होतात, तेव्हां ते परस्परांशीं सहकार्यहि करतात.

शिवाय ह्या भांडणांत कधीं एका गटाची, तर कधीं दुसऱ्या गटाची सरशी होते. ह्या भांडणाचा निकाल नेहमींच भांडणाऱ्या गटांच्या आपापल्या आर्थिक सामर्थ्यावर अवलंबून नसतो, तर वर्ण, धर्म, सामाजिक दर्जा, किंवा धार्मिक निष्ठा अशा वेगवेगळ्या अनेक गोष्टींवर अवलंबून असतो. यावरून आणखी एक निष्कर्ष आपोआपच निघतो, कीं शासनसंस्था ही कांहीं निव्वळ प्रभावी आर्थिकवर्गाची कार्यकारी समिति नसते. राजकीय लोकशाही लढ्यांत यशस्वी होणाऱ्या कोणत्याहि वर्गाची वा आघाडीची ती समिति वा साधन बनते. मी जेव्हां तरुण होतों आणि साबणाच्या पेटींत साबणवडी ठेवल्याइतक्या सहजपणें समाजवादी होतों, तेव्हां वेगवेगळ्या राज्यांत ज्या पदार्थांचें उत्पादन अधिक केंद्रीभूत झालेलें असेल त्या-त्या पदार्थांचीं लेबल्स त्या राज्यांतून निवडून येणाऱ्या सेनेटरांना लावत असे : कोळसा, पोलाद, रूळ, तांबें, तेल वगैरे लेबलें होतीं. आणि ते ज्या प्रकारें आणि ज्या बाजूनें मत द्यायचे, त्यावरून ते आर्थिक उद्दिष्टांचे








प्रतिनिधि होते, ही गोष्ट स्पष्ट होत असे. आतां, चालू शतकाच्या ह्या वळणावर, पटेल अशा रीतीनें हेंच आपण सर्व किंवा बऱ्याच सेनेटर्सविषयीं करूं शकूं काय ? सेनेटमध्यें असलेल्या उदारमतवादी सभासदांचा विचार केला, तर हें आतां जमेलसें मला वाटत नाहीं. मी कबूल करतों, कीं रॉकफेलर किंवा हॅरिमन यांसारख्या माणसांवर काय लेबल चिकटवतां येईल, हें मला निश्चितपणें सांगतां येणार नाहीं.

माझ्या समजुतीप्रमाणें वस्तुस्थिति अशी आहे, कीं इंग्लंड, फ्रान्स, बेल्जम, स्कॅंडेनेव्हिअन् देश, आणि अमेरिका यांचें शिक्षणामुळें व लोकशाही प्रक्रियेमुळें संमिश्र अर्थ व्यवस्थेच्या कल्याणकारी राज्यांत रूपांतर घडून आलें आहे. ह्या कल्याणकारी राज्यांतहि वर्ग-विग्रह अजून चालू आहेत, पण ते पारंपरिक मार्क्स-वादी योजनेनें आखल्याप्रमाणें चाललेले नाहींत.

मग मार्क्सच्या कल्पनांतलें उरलें तरी काय आहे ? आपण रहात असलेलें जग समजून घेण्याकरतां त्यांच्या-पैकीं कांहीं अजून उपयोगी पडतील काय ? आपल्या जगाला त्या लागू आज पडतात काय ? अजुनी लागू पडणाऱ्या कांहीं कल्पना आहेतसें मला वाटतें. त्या एकट्या मार्क्सच्याच आहेत किंवा काय, हा प्रश्न तितकासा महत्त्वाचा नाहीं. मार्क्सच्या रचनांत त्या आपल्याला सांपडतात, हें महत्त्वाचें आहे.

प्रथमतः, मार्क्सनें सामाजिक संबंध म्हणून केलेलें मालमत्तेचें विश्लेषण अजुनी उद्बोधक आहे, असें मला वाटतें. आणि विशेष म्हणजे, तें आपल्या समाजाला तर लागू पडतेंच पण सोव्हिएट समाजाला विशेषेंकरून लागू पडतें. मालमत्ता ही सत्ता आहे; आणि जमीन उत्पादनाचीं साधनें व लोकांना जीवनधारणा करण्या-करतां आवश्यक असणाऱ्या वस्तूंवर सत्ता देणारी माल-मत्ता ही, त्या वस्तूंच्या वापरावांचून जगूंच न शक-णाऱ्या मानवांवरील सत्ता आहे हें मार्क्सइतक्या स्पष्टपणें माझ्या माहितींतल्या दुसऱ्या कोणींच सांगित-लेलें नाहीं. अशा वस्तूंवरील सत्ता जितकी अधिक केवलरूप असेल, तितकी माणसांवरील सत्ता अधिक केवलरूप होते. आर्थिक शोषणाखेरीज शोषणाचे इतर प्रकार असणें शक्य आहे, हें मान्य केलें तरी आर्थिक सत्तेंतील विषमता हा शोषणाचा उद्गम असतो. अधि-काराचे प्रत्यक्ष नमुने जाणून घेण्याकरतां स्वामित्वाच्या कायदेशीर रूपाच्या मागें आपण नजर टाकली पाहिजे, असें मार्क्सनेंच सांगितलें. आणि असें आपण केलें, कीं आपल्याला काय आढळून येतें ? आपल्याच समा-जांत कामाचें दुसरें साधन उपलब्ध नसलेल्या व शाश्व-तीची कांहींएक हमी नसलेल्या अशा (एकच कार-खाना असलेल्या) गांवांत, मालकांनीं कारखाना बंद केला, तर अशा वेळीं ते इतर माणसांवर अतिशय प्रत्यक्षपणें सत्ता गाजवत असतात आणि आपल्या ह्या कृत्याकरतां ते स्वतःशिवाय कोणालाच जबाबदार नसतात. मालमत्तेची व्याख्या जर आपण तिच्या कार्यान्वित परिणामानुसार केली, आणि मग जर आपण उत्पादनाच्या साधनांचें राष्ट्रीयीकरण वा सामाजीकरण झालेल्या समाजा-कडे वळलों, तर आपल्याला असें आढळून येतें, कीं व्यक्तिगत धंदे असलेल्या, आर्थिक निर्णयाबाबत जनतेला कोणत्याहि प्रकारें जबाबदार नसलेल्या, व आर्थिक निर्णयांवर कसलेंच लोकशाही नियमन नसलेल्या अर्थव्यवस्थेंत कामगारांचें जितकें शोषण चालतें, तितकेंच किंबहुना त्यापेक्षां अधिक शोषण पहिल्या प्रकारच्या समाजांत होतें. मार्क्सनें स्वतः आपल्या कल्पना अशा परिस्थितीस कधींच लावून पाहिल्या नाहींत, कारण त्यानें असें गृहीतच धरलें कीं व्यक्तीच्या मालकीकडून जनतेच्या मालकीकडे बदल होतांना, लोकशाहीपूर्ण नियमन व उत्पादनाचे उच्चांक व पुरस्कार ठरविण्याच्या प्रक्रियेंत सहभागी होणें, हे शोषणाला आळा घालणारे दोन परिणामकारक घटक आपोआपच येतील. लोकशाही नसलेल्या, मोकळ्या ट्रेड युनियन्स अस्तित्वांत नसलेल्य, संप करण्याचा वा नोकरी सोडण्याचा हक्कच नसल्यानें सर्व कामगार बळजबरीनें कामगार असलेल्या कम्युनिस्ट देशांत कामगारांचें शोषण किती निलाजरेपणें चालतें, हें दाखवण्याकरतां मार्क्सच्या कल्पनांइतकें सोपें साधन नाहीं. भांडवलशाहींत किंवा लोकशाही व मोकळे-पणानें ट्रेड युनियनचे व्यवहार चालणाऱ्या संमिश्र अर्थव्यवस्थेंत शोषणाचें गूढ रहस्य शोधून काढणें त्या मानानें कठीण आहे.

नंबर दोन. मार्क्सचा सामाजिक skepticism — cynicism आणि skepticism यांत फरक







केला पाहिजे—मला तरी उद्‌बोधक वाटतो. व्यक्तींतली तर्कशक्ति क्वचितच विशुद्ध असते, आणि गट किंवा वर्ग यांचा संबंध आला, कीं ही शक्यता आणखी कमी होते. सामाजिक व्यवहारांतल्या vested interests चा अचूकपणें निर्देश करणें म्हणजे सामाजिक विचाराची आधारभूत भूमि सांपडण्यासारखें आहे. याचा अर्थ असा नव्हे, कीं आपण आपल्या उद्दिष्टांबद्दल– विशेषतः सर्वसामान्य उद्दिष्टांबद्दल– चिकित्सकता दाखवूंच शकत नाहीं. पण मार्क्सपासून मी शिकलों तें असें, कीं सर्व हेतू सामान्य नसतात आणि आपण आपल्या हेतूची कल्पना जरी व्यापक केली- मार्क्सनें तसें मुळींच केलें नाहीं– तरी ते सर्व सामान्य होऊं शकणार नाहींत. म्हणून Collectivized समाजांतहि सामाजिक उत्पादन, सामाजिक प्रतिष्ठा आणि सामाजिक सत्तेच्या वांटपावरून ते नव्या स्वरूपांत व्यक्त होण्याची दाट शक्यता आहे, एवढी अपेक्षा आपण बाळगायला हरकत नाहीं. मार्क्सची वर्गविग्रहाची कल्पना, आजच्या समाजांत जरी गभीरपणें ती अतिशय मर्यादित रीतीनें लागू पडत असली, तरी इतिहासकाळांत ती मार्क्सच्या स्वतःच्या कल्पनेपेक्षांहि अधिक व्यापकपणें लागू पडते. आणि संघर्षित हेतूंच्या अस्तित्वापेक्षां त्यांच्यांत तडजोड घडवून आणण्याचा मार्ग अधिक महत्त्वाचा आहे : छुप्या किंवा उघड दडपणानें किंवा लोकशाहीच्या प्रक्रियेनें. ह्यामुळें राजकीय निर्णयाच्या प्रकारास पाठबळ मिळतें.

नंबर तीन. माणसाच्या आणि मानवी स्वभावाच्या नैसर्गिक दुष्टतेबद्दल इतकें कांहीं कानावर येत असतांना अधिकाधिक क्षेत्रांत crisis theology च्या कल्पना फुटत असतांना ( थोड्याशा प्रमाणांत माणसाच्या आंतरिक चांगुलपणावरच्या आधींच्या मूर्ख श्रद्धा निभ्रम आतां नाहींसे झाल्यानें ) — मार्क्सचे मानवी स्वभावाबाबतचे विचार तो एक ऐतिहासिक शाश्वत आहे असें मानण्यास त्यानें दिलेला नकार –– यांना अजून एक धार आहे, उपयोग करण्याइतकी धार आहे, असें आपल्याला आढळून येईल. माणसाबद्दल, त्याच्या हेतूंबद्दल, प्रेरणांबद्दल त्याच्या अनुभवाच्या प्रकाराबद्दलच्या आपल्या बऱ्याच कल्पना ह्या प्रचलित सामाजिक संस्था व परंपरेंमुळें मर्यादित झालेल्या असतात. त्या निसर्ग-नियमाप्रमाणें न बदलतां कार्य करत नाहींत. त्यांच्यांत बदल हळूंहळूं घडून येतो, पण त्या बदलल्या आहेत आणि मानवी आचाराच्या सामाजिक परिस्थितींत जो बदल आपण घडवून आणूं, त्यामुळें होणाऱ्या पूर्वनियोजित परिवर्तनामुळें त्या परत बदलणें सहज शक्य आहे. मार्क्सचे मुद्दे जरी त्रोटक होते, तरी आपण ज्याला normal psychological perception किंवा normal psychological प्रतिक्रिया म्हणतों, तिचा बहुतांश भाग सामाजिक वा सांस्कृतिक मनोभावाच्या चौकटींच्या परिप्रेक्षेंत कोंडलेला असतो, हें त्यानें ओळखलें होतें.

नंबर चार. लोक आपली उपजीविका कशी करतात, उत्पादनांत त्यांची भूमिका काय असते, ती त्यांच्या गरजांविषयींच्या कल्पनांवर कसा प्रभाव टाकते, ग्राहकत्वांतलीं त्यांचीं उद्दिष्टें व रीत, त्यांच्या आशा–आकांक्षा, सुखाविषयींच्या कल्पना, एवढेंच काय पण त्यांच्या मानव, विश्व व इतिहास यांविषयींच्या कल्पना–यांचा निर्देश करण्याकरतां ढोबळ परंतु उपयुक्त विश्लेषण–पद्धति वापरणारा मार्क्स हा शास्त्रीय समाजविद्येच्या क्षेत्रांतला एक अग्रदूत होता, असें मला वाटतें. आपल्या सबंध समाजांत बूर्झ्वा–मूल्यें–the cash–nexus–चलतीं आहेत, किंवा ' पैसा बोलतो आहे ' असें म्हणणें अगदींच सामान्य झालें. परंतु बुद्धिमत्ता आणि आत्माभिमान सोडून बाकी सर्व कांहीं विकत घेऊं शकणारा पैसा अन्यापारेषु व्यापार करून तत्त्वज्ञानासारख्या क्षेत्रांतहि किती प्रमाणांत बोलूं शकतो, याची कल्पना आपल्याला अद्याप नाहीं, असें मला वाटतें. माणसांची सत्ता चालण्याऐवजीं माणसांवर सत्ता गाजवणाऱ्या व ज्यांच्यांत सामाजिक क्रिया दृश्य वस्तूंचे आकार घेतात, अशा जिनसांबाबतच नसती उत्तेजना आहे असें नव्हे, तर युद्ध, बेकारी, दारिद्र्य आणि सर्व तऱ्हांचें नैराश्य व सामाजिक विषमता ह्या नशिबाच्या किंवा नियतीच्या आज्ञा आहेत. सर्व वस्तूंच्या सनातन मांडणीचाच तो भाग आहे व माणसाचा त्याला इलाज नाहीं–हें माणसाला कल्पायला लावणाऱ्या सामाजिक शक्तींचाहि उदोउदो केला जातो आहे. ह्या








जिनसांच्या अकारण उत्तेजनेंतून निघणाऱ्या इतर उन्मादापासून आपली मुक्तता करण्यासाठीं मार्क्सचें साक्षेपी समाजशास्त्र वापरतां येईल.

नंबर पांच. आणि ह्यांतूनच निघणारा मार्क्सचा बुद्धिवाद मला उपयुक्त व लागू पडणारा वाटतो. समाजांतील व्यवहारांतला न्यायान्याय विचार व क्रिया शास्त्रीय ज्ञानावर अधिष्ठित करूं पाहणाऱ्या शास्त्रशुद्ध समाजवादावरील त्याच्या श्रद्धेंत ही गोष्ट स्पष्ट झाली होती. शास्त्रशुद्ध समाजवाद, जर तो खरोखरच शास्त्रशुद्ध असेल, तर मग इतर सर्व शास्त्रां-प्रमाणें तो स्वभावतःच revisionist असला पाहिजे. आणि घटकांच्या अनेकतेमुळें माणूस जरी समाजाच्या इतिहासावर नियंत्रण घालूं शकत नसला, तरी ह्या ज्ञानाच्या आधारावर, अपरिपूर्णपणें का होईना, माणूस आपल्या समाजाची रचना करूं शकेल, ह्या मार्क्सच्या विश्वासांतहि त्याचा बुद्धिवाद व्यक्त झाला होता. तत्त्वतः व आचारतः झालेलें अबुद्धिवादाचें सध्यांचें पुनरुत्थान आणि राजकीय कारणांमुळें ज्यांना योजना आंखणें प्राप्तच आहे, तेहि योजनाबद्धतेच्या विचाराला व तत्त्वज्ञानाला करत असलेला कडवा विरोध लक्षांत घेतां, मार्क्सच्या कल्पनांचें अजून टिकून असलेलें महत्त्व ध्यानांत येतें.

शेवटीं नंबर सहा. मला ही यादी आणखी वाढवतां येईल, परंतु येथेंच थांबतों. मार्क्सनें जरी फ्युअरबाख (Feuerbach) चें वैचारिक ऋण कधींच फेडलें नाहीं, तरी त्याच्याचपासून त्यानें घेतलेला मानवतावाद हा आजच्या जगांत मला अजून अतिशय आवश्यक व vital वाटतो. मार्क्सच्या मानवतावादाला अनेक पैलू आहेत. परिपूर्ण मानवाची त्याची कल्पना, अति-रेकी श्रमविभाजनाबद्दल व आत्यंतिक specialisa-tion-बद्दल त्याला वाटणारा अविश्वास, माणसा-माणसांतल्या दुराव्याबद्दल त्याला वाटणारी चिंता व हा दुरावा न लादलेल्या कार्यांतल्या सृजनात्मक सफलतें-तून भरून काढतां येतो, हा त्याचा दृष्टिकोन—हीं सर्व सार्वजनिक, सांस्कृतिक समस्यांशीं संबंधित—निगडित-आहेत. हीं सर्व अतिशय ढोबळ व अविकसित आहेत, आणि औद्योगीकरणाच्या व शहरीकरणाच्या अस्तित्वां-तूनच उपस्थित होणाऱ्या कांहीं गोष्टींकरतां मार्क्सनें भांडवलवादाला दोष दिला होता, हें खरें आहे. परंतु ह्या समस्या त्यानें जाणल्या होत्या.

हीं मार्क्सच्या कल्पनांतील व आदर्शांतील कांहीं जिवंत बीजें आहेत. ह्यांतून एखादी चळवळ निर्माण होईल, अशी आशा मला वीसेक वर्षांपूर्वी वाटली होती. "अनुभवानें शिकलेल्या घटकांनीं भक्कम झालेला, अधिक खोल नैतिक व मानसिक अंत-र्दृष्टीनें सज्ज झालेला व शास्त्रशुद्ध म्हणजे काय ह्याची आंतरिक जिज्ञासा असलेला, सामाजिक आदर्श प्रत्यक्षांत आणण्याकरतां सामाजिक हालचालींचा आंखलेला एक कार्यक्रम म्हणून, ह्या घटक—कल्पनांत एक सामाजिक तत्त्वज्ञान घडवण्याची धमक अजून आहे" असें मीं लिहिलें होतें. परंतु स्वतःला मार्क्स-वादी म्हणवणारी व प्रचलित लोकशाहीवादी चळवळीं-पासून स्वतःला विच्छिन्न करणारी कोणतीहि चळवळ आतां पश्चिमेंत यशस्वी होईल, याबद्दल मला शंका वाटते. लोकशाही हें समाजवादाच्या विकासाचें साधन असावें, अशी मार्क्सची श्रद्धा होती; आज लोकशा-हीची व्याप्ति वाढवण्याचें एक साधन म्हणूनच निव्वळ आपण समाजवादाकडे पाहिलें पाहिजे. जितक्या प्रमाणांत मार्क्सच्या कल्पना व आदर्श अद्याप उप-युक्त आहेत, तितक्या प्रमाणांत त्यांनीं आजच्या कोण-त्यातरी नियमन-व्यवस्थेंत किंवा रचनेंत स्वतःचा अंतर्भाव करून घेतलेला आहे, किंवा तसा ते करून घेऊं शकतात. परंतु मार्क्स फक्त आमचाच आहे, असा दावा कम्युनिस्टांना करूं देणें, ही माझ्यामतें इतिहासां-तील अतिशय गंभीर राजकीय चूक आहे. कम्यु-निस्टांवर टीका करायला मार्क्सवाद ही एक सर्वोत्तम भूमिका आहे.

मार्क्स परत वाचत असतांना, त्याच्यांतलें भिन्न जिवंत आढळतो, तो बंडखोर, शासनसंमेघ (nebu-बाळगूनहि तिची आवश्यकता मानून-सर्वत्र सारख्याच स्वातंत्र्याचा वैरी म्हणून बरेंचसें असलें तरी सबंध करणारा समाजवादी विश्वाचा हा एकजिनसीपणा (ज्यांना, मार्क्सच्या, निरीक्षणात्मक ज्योतिर्विज्ञानाने अन्नापेक्षांहि ... विश्वांत तेजोमेघ गटागटानीं विखुरले प्रतिष्ठेवर ... ते सव दिशाना सारख्याच प्रमाणांत विखु-विलासलेल्याचे आढळून येतात. आकाशांत एकाद्या पाहि-








शास्त्रशुद्ध मानवतावादी व बुद्धिवादी, दांतेची तुम्ही आपला मार्ग अनुसरा, लोकांना काय वाटेल तें बोलूं द्या!'' ही ओळ ज्याचें आवडतें ध्येयवाक्य होतें, असा स्वतंत्र बुद्धिमत्तेचा माणूस.

मार्क्सच्या कल्पनांवर भाष्य करणें व त्या भाष्याच्या आधारें अधिक चांगला समाज घडवून आणण्याकरतां चाललेल्या माणसाच्या न संपणाऱ्या साधनेंत अधिक सुयोग्य व उत्कृष्ट कल्पनांची भर घालणें- ही, माझ्या मतें, मार्क्सला आपण वाहिलेली सर्वोत्तम श्रद्धांजली होईल.

---

श्री. अद्वयानंद गळतगे

# विश्वाच्या उत्पत्तीविषयीचे दोन आधुनिक सिद्धांत : २ :

मागच्या लेखांकात 'उत्क्रांतिवादी' सिद्धांताचा आपण विचार केला. या 'उत्क्रांतिवादी' सिद्धांताला आधुनिक म्हणणें तितकेंसें बरोबर होणार नाहीं. कारण तशा प्रकारचा सिद्धांत बऱ्याच वर्षांपासून अस्तित्वांत आहे. पण आतां ज्या सिद्धांताचा विचार करावयाचा आहे तो सिद्धांत खऱ्या अर्थानें आधुनिक आहे. कारण तो अगदी अलीकडे (१९४८) मांडण्यांत आला आहे. हा सिद्धांत केवळ आधुनिकच नसून नवीनहि आहे. कारण या सिद्धांताप्रमाणें वस्तु सतत निर्माण होत असून विश्वाची उत्पत्ति निरंतर चालू आहे. हा निरंतरोत्पत्तीचा सिद्धांत बोंडी, गोल्ड आणि हॉईल या ब्रिटिश शास्त्रज्ञांनी (आणि जॉर्डन या जर्मन शास्त्रज्ञाने) मांडला असून कांहीं रशियन शास्त्रज्ञांनीहि त्याचा पुरस्कार केला आहे. पण रशियन शास्त्रज्ञांचा सिद्धांत वरील शास्त्रज्ञांच्या सिद्धांताहून भिन्न असून तो विरोधविकासवादी तत्त्वज्ञानावर आधारलेला आहे. तेथें ब्रिटिश शास्त्रज्ञांच्या सिद्धांताचा विचार करण्याचें ठरविलें आहे. हा 'स्थिरावस्था' सिद्धांत ('Steady State' theory) या नांवानें सामान्यतः ओळखला जातो.

तसें पाहिलें तर हा निरंतरोत्पत्तीचा सिद्धांत अगदीच नवीन आहे असें नाहीं. तशा प्रकारचा (अगदी तोच नव्हे) सिद्धांत कित्येक वर्षांपूर्वी मांडण्यांत आला होता. उष्णताचलनशास्त्राच्या दुसऱ्या नियमानुसार विश्व हळुहळु मृत्यु पावत आहे. ही गोष्ट न आवडल्यामुळें कांहींनीं दोन मृत तारे एकमेकांवर आदळून त्यापासून निर्माण होणाऱ्या शक्तीमुळें एकादा नवीन तारा निर्माण होणें शक्य आहे असें मत व्यक्त केलें होतें. या पद्धतीने मृत ताऱ्यापासून सतत नवीन तारे निर्माण होत राहतील. एडिंग्टननीं या मताला 'निरंतरोत्पत्ति-गंड' (Phoenix Complex) असें संबोधिलें होतें. बोंडी आणि गोल्ड यांचा सिद्धांत याहून भिन्न असून तो त्यांच्या 'विश्वशास्त्रीय तत्त्वा'वर आधारलेला आहे.

### 'विश्वशास्त्रीय तत्त्व'

विश्वाचें दृश्य क्षेत्र जसजसें वाढत जातें तसतशा अधिक व्यापक व मूलग्राही सिद्धांताची गरज भासूं लागते असें मागच्या लेखांत म्हटलें आहे. ही गरज मोठ्या दुर्बिणींच्या रचनेमुळे जास्त तीव्र स्वरूपांत निर्माण होते. कारण त्यामुळे विश्वाचा अति-दूरचा भाग आपणाला पाहावयास मिळतो. आणि या अति-दूरच्या भागाविषयीं एकादा प्रमाणभूत सिद्धांत रचावयाचा झाल्यास एकादें मूलभूत गृहीतकृत्य आवश्यक ठरतें. हें गृहीतकृत्य असें कीं या अतिदूर विश्वाची रचना कशीहि असली तरी तें विश्व जवळच्या विश्वाप्रमाणेंच वागतें. तें तसें वागत नसेल तर त्या अति-दूरच्या विश्वाविषयीं आपणांला निश्चित माहिती कधींच मिळणार नाहीं–नव्हे, कसलींच माहिती मिळणार नाहीं.

म्हणून बोंडी आणि गोल्ड यांनीं असें गृहीत धरलें आहे कीं भौतिक नियम स्थलानुसार बदलत नाहींत. म्हणजेच विश्वाची रचना आणि भौतिक नियम हे परस्परावलंबी नाहींत. विश्वाची रचना स्थानपरत्वें कशीहि असली तरी सबंध विश्व एकाच भौतिक नियमानी बद्ध आहे. आपण पहिल्या लेखांकात पाहिलेंच आहे कीं विश्वाची रचना स्थानपरत्वें भिन्न असल्याची आढळून येते. विश्वांत तेजोमेघ (nebulae) गटागटानीं विखुरले आहेत-सर्वत्र सारख्याच प्रमाणांत विखुरलेले नाहींत, असें असलें तरी सबंध विश्व एकजिनसी आहे. विश्वाचा हा एकजिनसीपणा (Uniformity) निरीक्षणात्मक ज्योतिर्विज्ञानानें सिद्ध केला आहे. विश्वांत तेजोमेघ गटागटानीं विखुरले असले तरी ते सव दिशाना सारख्याच प्रमाणांत विखुरले असल्याचे आढळून येतात. आकाशांत एकाद्या







विशिष्ट दिशेला जास्त प्रमाणांत व दुसरीकडे कमी प्रमाणांत पसरले आहेत, असें आढळून येत नाहीं. विश्वाच्या या एकजिनसीपणाला– विश्व स्थानपरत्वें भिन्न असलें तरी मोठ्या प्रमाणावर ठराविक नियमानुसार वागतें या वस्तुस्थितीला– बाँडी आणि गोल्ड यानीं विश्वशास्त्रीय तत्त्व ( Cosmological principle ) असें नांव दिलें आहे.

विश्वाचे भौतिक नियम स्थानपरत्वें बदलत नसले तरी ते कालपरत्वें बदलत नसतील असें नाहीं. दोन अब्ज वर्षांपूर्वीचें विश्व हल्लीच्या विश्वाप्रमाणेंच वागत असेल असें म्हणतां येत नाहीं. अशारीतीनें कालपरत्वें विश्वाचें स्वरूप बदलत असेल तरीहि आपल्याला विश्वाचें निश्चित ज्ञान होणार नाहीं. दोन अब्ज वर्षांपूर्वीचें विश्व कसें होतें हें आपणांस कसें कळणें शक्य आहे असें कोणी म्हणेल. पण आपण दोन अब्ज प्रकाशवर्षें अंतरावरील तेजोमेघाकडे जेव्हां, पाहतों तेव्हां आपण दोन अब्ज वर्षांपूर्वीच्या विश्वाकडेच पाहात असतों. कारण दोन अब्ज वर्षांपूर्वी त्या भागांतून निघालेला प्रकाश आज आपणाला पोचलेला असतो. स्वाभाविकपणें एवढ्या अवधींत विश्वाचें स्वरूप बदललें असेल तर त्या विश्वाविषयींचा आपला सिद्धांत खोटा ठरतो. अशारीतीने सबंध विश्वाला आपला सिद्धांत लागू व्हायचा असेल तर विश्व कालपरत्वेंहि बदलत नाहीं असें गृहीत धरावें लागतें. अशारीतीने विश्वशास्त्रीय तत्त्वाचा या शास्त्रज्ञानीं कालाच्या दृष्टीने विस्तार केला असून त्याला त्यानीं निर्दोष विश्वशास्त्रीय तत्त्व ( Perfect Cosmological Principle ) असें नांव दिलें आहे.

अशाप्रकारें विश्व एकजिनसी असेल व कालपरत्वें बदलत नसेल तर भौतिक नियमांनी त्याचें आपल्याला निश्चित ज्ञान होईल. पण तें असें असेल कशावरून ? या विश्वशास्त्रीय तत्त्वाला पर्याय नाहीं असें नाहीं. उदाहरणार्थ विश्व एकजिनसी असूनहि कालपरत्वें बदलूं शकेल. आणि तरीहि भौतिक नियमांनीं त्याचें आपल्याला निश्चित ज्ञान होईल. पण त्यासाठीं निराळें एकादें गृहीतकृत्य आवश्यक ठरतें. हें गृहीतकृत्य म्हणजे 'उत्क्रांतिवादी' गृहीतकृत्य होय. त्याचा आपण मागच्या लेखांत विचार केला आहे. पण विश्व कालपरत्वें बदलत नाहीं असें गृहीत धरल्यास 'उत्क्रांतिवादी' सिद्धांत आपोआप त्याज्य ठरतो.

हें निर्दोष विश्वशास्त्रीय तत्त्व मान्य केल्यास त्यापासून कांहीं निष्कर्ष निघतात. या निष्कर्षांना निरीक्षणानें कितपत बळकटी मिळते यावर या विश्वशास्त्रीय तत्त्वाची सत्यता अवलंबून आहे. या तत्त्वापासून निघणाऱ्या निष्कर्षांचा आतां विचार करूं.

## वस्तूची निरंतरोत्पत्ति

या तत्त्वाचा एक महत्त्वाचा ( आणि सर्वांत आश्चर्यकारक ! ) निष्कर्ष म्हणजे विश्वांत वस्तू सतत निर्माण झाली पाहिजे. वरील निर्दोष विश्वशास्त्रीय तत्त्व मान्य केल्यास हा निर्णय अटळ आहे. वस्तूची ही निरंतरोत्पत्ति ( Continuous creation of matter ) हें गृहीत कृत्य नसून गृहीतकृत्याचा परिणाम आहे. विश्व एकजिनसी रहावयाचें असेल व कालपरत्वे त्याचें स्वरूप बदलावयाचें नसेल तर आकाशांत वस्तूची निरंतर उत्पत्ति होणें आवश्यक आहे. ती तशी उत्पन्न होत नसेल तर विश्व एकजिनसी राहणार नाहीं. पुढील विवेचनावरून हें स्पष्ट होईल.

मागच्या लेखांत आपण पाहिल्याप्रमाणें विश्व प्रसरण पावत असल्याचें आढळून आलें आहे. तें तसें प्रसरण पावण्याचें कारण कांहीहि असलें तरी त्यामुळें तें एकजिनसी राहत नाहीं हें उघड आहे. विश्व एकजिनसीं राहावयाचें झाल्यास तें स्थितिशील असावयास पाहिजे.– गतिशील नको, पण एकजिनसी याचा अर्थ स्थितिशीलता नव्हे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. गतिशील विश्वसुद्धां एकजिनसी असूं शकतें, पण त्यासाठीं गतिशील विश्वाची गति एकजिनसी असावयास पाहिजे. ही गति एकजिनसी असल्याची आढळून आली आहे. तेजोमेघ ज्या वेगाने परस्परांपासून दूर पळत आहेत ते वेग त्यांच्या परस्पर अंतराशीं समप्रमाणांत आहेत असें आढळून आलें आहे. ते एकमेकांपासून जितके अधिक दूर असतील तितक्या अधिक वेगाने पळत आहेत. हा प्रसरणाचा एकजिनसीपणा विश्वशास्त्रीय तत्त्वाशी सुसंगत आहे.

प्रसरण पावणारें विश्व विश्वशास्त्रीय तत्त्वाशी सुसंगत असलें तरी तें केवळ एकजिनसीपणाच्या बाबतींतच सुसंगत आहे. विश्व कालानुसार बदलता कामा नये या



अनुक्रमणिका








तत्त्वाशी सुसंगत नाहीं. विश्व प्रसरण पावत असल्यामुळें विश्वाची सरासरी सांद्रता ( Average density ) कमी होत आहे. विश्वाची सरासरी सांद्रता कालानुसार बदलली तर निर्दोष विश्वशास्त्रीय तत्त्वाला बाधा येते. कारण या तत्त्वाप्रमाणें विश्वाचें स्वरूप कालानुसार बदलत नाहीं. तें कायम स्वरुपाचें आहे. ( Steady state universe ). विश्वांतील वस्तूची सरासरी सांद्रता प्रसरणामुळे कमी होत असेल तर ती भरून काढण्यासाठीं – विश्वाचें स्वरूप कायम राखण्यासाठीं – अवकाशात वस्तु निर्माण झाली पाहिजे. निर्दोष विश्वशास्त्रीय तत्त्वाचा हा अपरिहार्य परिणाम आहे. अशारीतीने हे शास्त्रज्ञ वस्तूच्या निरंतरोत्पत्तीच्या सिद्धांताला अपरिहार्यपणें येऊन पोंचतात.

आतां ही वस्तु कोठून निर्माण होते ? कोठूनहि नाहीं. हवें तर शून्यांतून निर्माण होते म्हणावें. एका क्षणापूर्वी जेथें कांहींच नव्हतें तेथें एका क्षणानंतर एकदम वस्तु अस्तित्वांत आली असल्याची दिसून येते. जेथें मुळांत कांहींच नव्हतें तेथें एकदम काहींतरी अस्तित्वांत आलें असेल तर तें कोठून तरी आलें असलें पाहिजे. पण हा भाषेचा दोष आहे. तें कोठूनहि येत नाहीं. हा या सिद्धांताचा सर्वांत आश्चर्यकारक भाग आहे

आतां कोणी म्हणेल शून्यांतून वस्तूची उत्पत्ति होणें हें भौतिक नियमांचें उल्लंघन आहे. पण तें नियमाचें उल्लंघन नसून तो एक नियमच आहे. या ' स्थिरावस्था ' सिद्धांताप्रमाणें वस्तूची शून्यांतून उत्पत्ति होणें हा एक नवीन भौतिक नियम असून तो शोधून काढल्याबद्दल आपल्याला आनंद झाला पाहिजे. कारण त्यामुळें सापेक्षता सिद्धांतातील एक मोठी उणीव भरून निघाली आहे. मागच्या लेखांत आपण पाहिलेंच आहे कीं सापेक्षता सिद्धांताशी जुळणारे अनंत सिद्धांत शक्य असून त्यांपैकीं आपल्याला फक्त एक सिद्धांत निवडावयाचा आहे. तो कसा निवडावयाचा हा आपल्यापुढचा प्रश्न होता. तो प्रश्न आता सुटतो. तो एकमेव सिद्धांत आपल्याला निवडता येत नव्हता याचें कारण विश्वांतील हा ( निरंतरोत्पत्तीचा ) नवीन भौतिक नियम आपल्याला सापडत नव्हता. हा नवीन भौतिक नियम आता आपल्याला सापडला असून विश्वाचें निश्चित स्वरूपाचें चित्र रेखाटणें त्यामुळें शक्य झालें आहे.

आतां ही वस्तु निरंतर उत्पन्न झाली पाहिजे. कारण विश्वांतील वस्तूची सांद्रता निरंतर कमी होत आहे. आणि ही सांद्रता निरंतर कमी होण्याचें कारण विश्व निरंतर प्रसरण पावत आहे. ही कमतरता भरून काढण्यासाठीं, म्हणजे विश्वांतील वस्तूची सरासरी सांद्रता स्थिर राखण्यासाठीं वस्तु निर्माण होण्याचा वेग कमतरता पडण्याच्या वेगाशीं समान असला पाहिजे हें उघड आहे. म्हणजे वस्तुच्या निर्मितीचा वेग विश्वाच्या प्रसरणाच्या वेगावर अवलंबून असून प्रसरणाच्या वेगावरून तो ठरविता येतो. हा वेग प्रत्येक घन सेंटिमीटरला सेकंदाला $१०^{-४३}$ ग्रॅम असल्याचा आढळून येतो. हेंच दुसऱ्या शब्दांत असें सांगतां येईल कीं एका मोठ्या कपाटाएवढ्या जागेंत तीन लक्ष वर्षांत एक हैड्रोजनचा अणु निर्माण होतो. निरीक्षणाने हें शोधून काढणें अर्थातच अशक्य आहे. पण म्हणून हा सिद्धांत निरीक्षणाने पडताळून पाहता येण्यासारखा नाहीं असें नाहीं, कारण सबंध विश्वाचा विचार केल्यास या उत्पत्तीच्या वेगाचा परिणाम जाणवल्याखेरीज राहत नाहीं. आणि हा परिणाम आपणाला पडताळून पाहतां येईल. सबंध विश्वाचा ( ' सबंध विश्व ' म्हणजे ' दृश्य विश्व ' ) विचार केल्यास हा वेग सेकंदाला $१०^{३२}$ टन असल्याचा आढळून येतो, आपल्या सूर्याचें वजन $२\times१०^{२७}$ टन आहे. म्हणजे दृश्य विश्वांत सेकंदाला ५०,००० सूर्य उत्पन्न होत आहेत असें म्हणतां येईल. या वेगाने एका वर्षांत जे सूर्य उत्पन्न होतील त्या सूर्यांनीं आपल्या आकाशगंगे एवढें मोठे १६ तेजोमेघ तयार होतील. हे नवीन तेजोमेघ विश्वांत आपल्याला पाहायला मिळाले पाहिजेत. पण ही उत्पन्न झालेली वस्तु सबंध विश्वांत पसरलेली आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे, आणि त्या वस्तूपासून तेजोमेघ घनीभूत व्हायला कित्येक कोटि वर्षे लागतात. पण ही उत्पन्न होण्याची व घनीभूत होण्याची क्रिया सतत चालू असल्याकारणाने कांहीं तेजोमेघ अगोदरच घनीभूत झालेले, तर आणखी कांहीं तेजोमेघ हल्ली घनीभूत होत असलेले आपल्याला दिसून येतील. अगोदरच घनीभूत झालेले तेजोमेघ आपल्याला पाहायला मिळाले पाहिजेत, पण दुर्दैवाने

हें ओळखणें फार कठीण आहे. हॅरोल्ड स्पेन्सर-जोन्स या ब्रिटिश खगोलशास्त्रज्ञाच्या मतें कॅमेलोपार्डसमधील एन्. जी. सी. २४०३ या नंबरचा तेजोमेघ अशा नवीन उत्पन्न झालेल्या वस्तूपासून अलीकडे घनीभूत झालेला असावा. उलट फ्रेड हॉईल यांच्या मतें कन्या राशींतील मीसीयर ८७ नंबरचा तेजोमेघ अशारीतीने घनीभूत झालेला असावा, पण हें ठरविणें फार कठीण आहे. त्यासाठीं तेजोमेघांचें वय ओळखण्याचें तंत्र अवलंबिलें पाहिजे. पण त्याचा विचार करण्यापूर्वी या सिद्धांतापासून निघणाऱ्या आणखी एका निष्कर्षाचा विचार करतां येईल.

## स्थिरावस्थ विश्व आणि विश्वाच्या — निरंतरोत्पत्तीचा नियम

विश्वाच्या प्रसरणामुळें विश्वांतील वस्तूच्या सरासरी सांद्रतेमध्यें जी उणीव निर्माण होत आहे ती भरून काढण्यासाठीं वस्तु उत्पन्न होत आहे असें आपण वर म्हटलें; पण विश्व कशामुळें प्रसरण पावत आहे ? हा प्रश्न आतां ताबडतोब सुटतो; कारण विश्वांत दडलेला एक नवीन नियम आपल्याला सापडला असल्याकारणानें त्याच्या सहायानें इतर गोष्टींची आपल्याला आतां उत्पत्ति लावतां येईल. वस्तूची निरंतरोत्पत्ति हा नवीन नियम आतां विश्वशास्त्राचा आधारभूत नियम झाला. कारण तो मूलभूत गृहीतकृत्याचा परिपाक आहे.

या नवीन नियमाचा एक अपरिहार्य परिणाम म्हणजे उत्पन्न झालेल्या वस्तूमुळें विश्वांतील अगोदर उत्पन्न झालेली वस्तु दूर ढकलली गेली पाहिजे. विश्व प्रसरण पावलें पाहिजे. वस्तु सतत उत्पन्न होत असल्याकारणानें तिचा अवकाशावर परिणाम होऊन तो प्रसरण पावतो. 'उत्क्रांतिवादी' सिद्धांतामध्यें विश्व प्रसरण पावण्याचें कारण तें पूर्वी अतिसांद्र अवस्थेंत दाबलें गेलें होतें असें सांगण्यांत येतें. ही दाबलेली अवस्था विश्वांत हल्ली आढळून येणाऱ्या वस्तूच्या स्वरूपाला कारणीभूत आहे, असें तो सिद्धांत प्रतिपादितो. म्हणजे या सिद्धांताप्रमाणें विश्वांत हल्ली आढळून येणारी वस्तु विश्वाच्या या अतिसांद्र अवस्थेच्या नियमांनी तयार झाली आहे. पण हें विलक्षण नाहीं काय ? वस्तूचें स्वरूप भूतकाळांत एके काळीं अस्तित्वांत असलेल्या नियमांनीं कां ठरावें ? हल्ली अस्तित्वांत असलेल्या परिस्थितीवरून व नियमावरून तें कां ठरूं नये ? काळाच्या बाबतींत विश्व फरक करणारें आहे काय ? पण विश्व एकजिनसी व कालानुसार न बदलणारें आहे असें गृहीत धरल्यास विश्वाचा हा विसंगतपणा आपोआप नाहींसा होतो, वस्तूच्या सतत उत्पत्तीचा नियम विश्वाचा हा सुसंगतपणाच सिद्ध करतो. कारण हा नियम भूतकाळाप्रमाणेंच हल्लीहि कार्यप्रवण असून तो निरीक्षणानें पडताळून पाहतां येईल. उलट 'उत्क्रांतिवादी' सिद्धांताप्रमाणें एक सर्वात महत्वाची घटना-विश्वाची उत्पत्ति-भूतकाळात दूर घडली असल्याकारणाने ती निरीक्षणाच्या आवाक्याबाहेर जाते.

आतां वस्तु निरंतर उत्पन्न होत असेल तर ती जाते कोठे असा एक प्रश्न उद्‌भवतो, विश्वांतील तेजोमेघ एकमेकापासून दूर पळत आहेत हें आपण मागें पाहिलेंच आहे. हे तेजोमेघ कोठें जात आहेत ? सर्वांत दूरचे तेजोमेघ इतक्या वेगानें पळत आहेत कीं त्यांचा प्रकाश आपणाला बराच क्षीण होऊन पोचतो. त्याच्यापेक्षांहि दूर असलेले तेजोमेघ प्रकाशाच्या वेगानें पळत असल्याकारणानें त्यांचा प्रकाश आपणाला पोचतच नाहीं. हे तेजोमेघ व प्रकाशापेक्षांहि जास्त वेगानें पळणारे त्यांच्याहि पलीकडचे तेजोमेघ आपल्याला कधींच पाहायला मिळत नाहींत. अशाप्रकारें विश्वाला एक दृश्य मर्यादा पडली असून तिच्या पलीकडचें विश्व आपल्याला पूर्णपणें अज्ञात आहे. ही दृश्य मर्यादा १० अब्ज प्रकाशवर्षें अंतरावर संपते असें आढळून येतें. म्हणून प्रसरण पावणाऱ्या विश्वांतील तेजोमेघ सतत या दृश्य विश्वाच्यापलीकडे (अज्ञातवासांत) निघून जात आहेत, असें म्हणतां येईल. वस्तूची निरंतर उत्पत्ति होत असून उत्पन्न झालेली वस्तु निरंतरपणें या दृश्य विश्वाच्या पलीकडे निघून जात आहे.

यावरून अवकाश (Space) अनंत आहे हें आपोआपच ठरतें. सतत उत्पन्न होणाऱ्या वस्तूला जागा करून देण्यासाठीं विश्वाला सतत प्रसरण पावावें लागतें आणि तें सतत प्रसरण पावण्यासाठीं अवकाश अनंत असावयास पाहिजे. तसेंच विश्वाची सतत उत्पत्ति होत असल्याकारणाने कालहि अनंत ठरतो. विश्वाला 'सुरवात' कधीच झालेली नाहीं. विश्व अनंत कालापासून अस्तित्वांत असून तें अनंत काला-



अनुक्रमणिका








पर्यंत तसेंच अस्तित्वांत राहणार आहे. विश्वाला आदि नाहीं, आणि अंतहि नाहीं, हिंदु कल्पनेप्रमाणेंच हें ' स्थिरावस्था ' सिद्धांताचें विश्वहि अनादि आणि अनंत आहे. उलट ' उत्क्रांतिवादी ' सिद्धांताप्रमाणें विश्वाला निश्चितकालीं सुरवात झाली आहे. आतां विश्वाला निश्चितकालीं सुरवात झाली असेल त्याच्यापूर्वी काल काय करीत होता असा प्रश्न उद्भवतो, ' कालाची सुरवात ' ही कल्पनाच वदतोव्याघाती आहे. पण ' स्थिरावस्था ' सिद्धांतामध्यें हा प्रश्नच उद्भवत नाहीं. कारण या सिद्धांताप्रमाणें काल अनादि आहे; आणि विश्व अनादि कालापासून अस्तित्वांत आहे.

आतां उष्णताचलनशास्त्राच्या दुसऱ्या नियमाचें काय ? या नियमाप्रमाणें विश्व पूर्णावस्थेंतून अपूर्णावस्थेकडे जात आहे-विश्व हळुहळु मृत्यु पावत आहे, अर्थात् हा नियम या सिद्धांतालाहि लागू आहेच. विश्वांतील वस्तु हळुहळु थंड होत आहे हें खरेंच आहे. तेजोमेघ उत्पन्न होत आहेत; वाढत आहेत; वृद्ध होत आहेत; व मृत्यु पावत आहत हें खरें आहे. पण मृत्यु पावणारे तेजोमेघ दृश्य विश्वाच्या पलीकडे निघून जात आहेत; आणि त्यांची जागा घ्यायला नवीन तेजोमेघ सतत जन्माला येत आहेत. विश्वांतील तेजोमेघ बदलत असले तरी विश्वाचें स्वरूप बदलत नाहीं. तें कायम राहतें. विश्वांतील वस्तु निर्माण होते व नष्ट पावते-विश्व नष्ट पावत नाहीं. उष्णताचलनशास्त्राचा दुसरा नियम विश्व अशारीतीने पाळतें. ( किंवा टाळतें म्हणा हवें तर. )

विश्वांत वस्तु निरंतर उत्पन्न होत आहे हा गुरुत्वाकर्षणासारखाच एक भौतिक नियम असल्याकारणाने विश्वाची वागणूक या नियमानुसार ठरली पाहिजे, हें ओघानेच आलें. उदाहरणार्थ विश्व प्रसरण पावत आहे तें या उत्पन्न होणाऱ्या वस्तूमुळेंच होय. आतां हें विश्व विशिष्ट वेगानेच का प्रसरण पावत आहे ? कारण वस्तु एका ठराविक वेगाने उत्पन्न होत आहे म्हणून होय. हा वस्तु उत्पन्न होण्याचा वेग विश्वांतील वस्तूच्या सरासरी सांद्रतेवर अवलंबून असून या सरासरी सांद्रतेची मर्यादा ठरलेली आहे. विश्वांतील वस्तूची सरासरी सांद्रता या ठराविक मर्यादेपेक्षा कमी झाली तर ती पूर्वस्थितीला आणण्यासाठीं वस्तु जास्त प्रमाणांत उत्पन्न होईल, आणि हळुहळु ती पूर्वीची मर्यादा गाठली जाईल. उलट विश्वांतील वस्तूची सरासरी सांद्रता या मर्यादेहून अधिक झाली तर विश्व अधिक वेगाने प्रसरण पावूं लागेल; व पुन्हा ती पूर्वीची मर्यादा गाठली जाईल. विश्वांतील वस्तूची सरासरी सांद्रतेची ही ठराविक मर्यादा हबलच्या कॉन्स्टंटवर अवलंबून असून ती कधीच बदलत नाहीं. विश्वाच्या स्थिरावस्थेच्या गृहीतकृत्याचा हा परिणाम आहे.

विश्वांतील वस्तूच्या सरासरी सांद्रतेची ही मर्यादा ' कधीच ' बदलत नसली तरी ' कांहीं ठिकाणीं ' ती बदलते. पण हा केवळ स्थानिक बदल आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे आणि हा बदल महत्त्वाचा आहे. आपण मागे पाहिल्याप्रमाणें विश्वांत तेजोमेघ गटागटांनीं विखुरले आहेत. आता या गटांचें वैशिष्ट्य असें कीं ते एकमेकापासून दूर पळत असले तरी या गटांतील तेजोमेघ एकमेकापासून दूर पळत नाहींत. म्हणजे हे गट ' बंदिस्त ' आहेत. यावरून हें उघड आहे कीं परस्पर गटामधील गुरुत्वाकर्षणशक्तीपेक्षां परस्पर तेजोमेघामधील गुरुत्वाकर्षणशक्ति कितीतरी पटीने अधिक आहे, हेंच दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें तर परस्पर गटामधील वस्तूच्या सरासरी सांद्रतेपेक्षा परस्पर तेजोमेघामधील वस्तूची सरासरी सांद्रता अधिक आहे. परस्पर तेजोमेघामधील वस्तूची ही सरासरी सांद्रता परस्पर गटामधील वस्तूच्या सरासरी सांद्रतेपेक्षा **कमीतकमी दोन-तीन पटीनें** अधिक असावयास पाहिजे. तरच ते गट ' बंदिस्त ' होतील. याचा अर्थ असा कीं विश्वांतील वस्तूच्या सरासरी सांद्रतेची वर उल्लेखिलेली ठराविक मर्यादा कांहीं ठिकाणी कमींतकमी दोनतीन पटीने बिघडली पाहिजे ! पण तेजोमेघांच्या गटांची उपपत्ति लावण्यासाठीं हें अपरिहार्य आहे. अशारीतीने या गटांची उपपत्ति लावण्यासाठीं विश्वाच्या एकजिनसीपणाच्या नियमाचें- विश्वांतील वस्तूची सरासरी सांद्रता सारखी असली पाहिजे या नियमाचें-बंधन थोडें सैल करावें लागतें. विश्व स्थानपरत्वें बदललें तरी मोठ्या प्रमाणावर बदलत नाहीं या विधानाचा हाच अर्थ आहे.

अशारीतीने ' उत्क्रांतिवादी ' सिद्धांताप्रमाणेंच हा ' स्थिरावस्था ' सिद्धांतसुद्धां विश्वाच्या प्रसरणाची उपपत्ति समाधानकारकपणें लावूं शकतो. तसेंच त्याच्या



अनुक्रमणिका

वेगाचीहि उपपत्ति लावूं शकतो. पण ही त्याची उपपत्ति 'उत्क्रांतिवादी' सिद्धांताच्या उपपत्तीहून भिन्न असून तिची सत्यासत्यता आपल्याला निरीक्षणानेंच ठरवावी लागेल. विशेषतः 'स्थिरावस्था' सिद्धांत पूर्णपणें एका गृहीतकृत्यावर अवलंबून असल्याकारणानें त्या सिद्धांताचा खरेपणा ठरविण्यासाठीं तें गृहीतकृत्य कितपत खरें आहे हें अगोदर ठरविलें पाहिजे. म्हणजेच तें गृहीतकृत्य निरीक्षणाने आढळून येणाऱ्या विश्वाशी कितपत जुळतें हें पाहिलें पाहिजे. पण आपण पहिल्या लेखांकात पाहिल्याप्रमाणें विश्वाविषयीचा कोणताहि सिद्धांत मूलतत्त्वांच्या प्रमाणांची जर समाधानकारकपणें उपपत्ति लावूं शकत नसेल तर तो सिद्धांत एरवी कितीहि समर्थनीय असला तरी असंभवनीय आणि दुर्बल मानावा लागतो. 'उत्क्रांतिवादी' सिद्धांत मूलतत्त्वांची उपपत्ति समाधानकारकरीत्या लावू शकतो हें आपण पाहिलेंच आहे. 'स्थिरावस्था' सिद्धांत याची उपपत्ति कितपत समाधानकारकपणें लावूं शकतो हें पाहिलें पाहिजे.

## मूलतत्त्वांची उपपत्ति

विश्वांत हैड्रोजनचें बाहुल्य आढळून येतें ही गोष्ट असें सुचविते कीं उत्पन्न होणारी वस्तू हैड्रोजनच्या रूपांतच असली पाहिजे. वास्तविकरीत्या उत्पन्न होणारी वस्तू कोणती असावी याविषयी कसलेंच बंधन नाहीं, म्हणून ती हैड्रोजनच्या रूपांतच असली पाहिजे असें कांहीं नाहीं. ती न्यूट्रॉनच्या रूपांतसुद्धां असूं शकेल. (पण प्रोटॉनच्या रूपांत ती असणार नाहीं. कारण प्रोटॉनमधील एकमेव धन कणामुळें विश्वाच्या एकजिनसीपणाला बाधा येते.) पण विश्वांत हैड्रोजनचें प्रमाण शेंकडा ५० टक्क्याहूनहि जास्त असल्याकारणानें वस्तू हैड्रोजनच्या रूपांतच उत्पन्न होत असावी अशा समजुतीला आधार मिळतो. आतां ताऱ्यामध्यें हैड्रोजनचें सतत हेलीयममध्यें रूपांतर होत असतें व तारे या हैड्रोजन-हेलीयम परिवर्तन-क्रियेमुळें प्रकाशत असतात हें प्रसिद्धच आहे. अशारीतीनें विश्वांतील हैड्रोजन व हेलीयम या मूलतत्त्वांचें प्रमाण शेकडा ९९ टक्के आहे या वस्तुस्थितीची या सिद्धांताला उपपत्ति लावतां येते.

पण जड मूलतत्त्वांची गोष्ट वेगळी आहे. कारण वस्तु हैड्रोजनच्या रूपांत उत्पन्न होत असेल तर त्या हैड्रोजनपासून तयार होणाऱ्या ताऱ्यामध्यें केवळ हैड्रोजनच आढळून आलें पाहिजे. जड मूलतत्त्वें आढळून येतां कामा नयेत. पण आतांपर्यंत एकहि तारा केवळ हैड्रोजनचा (किंवा केवळ हैड्रोजन व हेलियम यांचा) बनलेला आढळून आलेला नाहीं. अगदी प्राचीनतम तारा घेतला तरी त्यामध्यें कॅल्शम व लोखंड यासारखीं थोडींतरी जड मूलतत्त्वें आढळून येतातच. या वस्तुस्थितीची कशी उपपत्ति लावायची ?

हॉईल यांच्या मतें जड मूलतत्त्वें ताऱ्यांच्या पोटांत तयार होतात. पण ताऱ्यांच्या पोटांत तयार झालेलीं मूलतत्त्वें त्यांच्या पोटांतच बंदिस्त होऊन राहतील. ताऱ्यांच्या पृष्ठभागावर तीं आढळून येणार नाहींत, पण ताऱ्यांच्या पृष्ठभागांत जड मूलतत्त्वें आढळून येतात याचें काय ? यासाठीं हॉईलनीं एक युक्ति शोधून काढली आहे. ('उत्क्रांतिवादी' सिद्धांतामध्यें ही अडचण उद्‌भवत नाहीं. कारण या सिद्धांताप्रमाणें जड मूलतत्त्वें विश्वाच्या अतिसांद्र अवस्थेंत निर्माण झालीं असल्याकारणानें आणि त्या अतिसांद्र अवस्थेंतूनच सर्व ताऱ्यांचा जन्म झालेला असल्याकारणानें सर्व ताऱ्यामध्यें तीं मूलतत्त्वें सारख्याच प्रमाणांत आढळून येतील) हॉईल यांची युक्ति एका विशिष्ट परिस्थितीमुळें येथे लागू झाली आहे. ही परिस्थिति म्हणजे ताऱ्यांचा स्फोट होय. कांही तारे अधूनमधून स्फोट पावत असल्याचें आढळून येतात. ताऱ्यांच्या घनतेनें एक विशिष्ट मर्यादा ओलांडली (हिला 'चंद्रशेखरची मर्यादा' म्हणतात, कारण मद्रासी खभौतशास्त्रज्ञ चंद्रशेखर यानीं ती पहिल्यांदा ठरविली.) तर त्या ताऱ्याचा स्फोट होण्याचा संभव वाढतो. जॉर्ज गॅमो यानी दाखवून दिल्याप्रमाणें हा स्फोट न्यूट्रिनो नांवाच्या कणांच्या प्रचंड निर्मितीमुळें होतो. या स्फोट पावणाऱ्या ताऱ्यांना अतिनूतन (Super-nova) तारे म्हणतात. अशा स्फोट पावलेल्या ताऱ्यांतून त्यांच्या पोटांतील जड मूलतत्त्वें अवकाशांत इतस्ततः विखुरलीं जातील हें उघड आहे. हीं मूलतत्त्वें अर्थात् अवकाशांत अगोदरच उत्पन्न झालेल्या हैड्रोजनमध्यें मिसळतील. आणि अशा

हैड्रोजनपासून तयार होणाऱ्या ताऱ्यामध्यें तीं आढळून येतील. हीं जड मूलतत्त्वें स्फोट पावणारे तारे सतत हैड्रोजनमध्यें मिसळत असल्याकारणाने एकहि तारा या जड मूलतत्त्वाविरहित आढळून येणार नाहीं. कारण उत्पन्न झालेल्या हैड्रोजनमध्यें तीं मूलतत्त्वें मिसळण्यासाठीं तारे नेहमीच अगोदर अस्तित्वांत असतात. अशारीतीने प्रत्येक ताऱ्यांत जड मूलतत्त्वें आढळून येतात या वस्तुस्थितीची उपपत्ति लावतां येते.

पण ताऱ्यांतील जड मूलतत्त्वांच्या अस्तित्वाची उपपत्ति देतां आली तरी मूलतत्त्वें ज्या प्रमाणांत आढळून येतात त्या प्रमाणाची त्यामुळें उपपत्ति लागत नाहीं. जड व मध्यम जड मूलतत्त्वांच्या प्रमाणाला संख्यात्मक पुरावा देण्याचा हॉईल यानी प्रयत्न केला आहे. नाहीं असें नाहीं, पण तो जुजबी असून त्याला काटेकोरपणा देण्यांत त्याना यश आलेलें नाहीं. आणि यात कांहींच आश्चर्य नाहीं. कारण निरीक्षणाने आढळून येणाऱ्या जड मूलतत्त्वाचें प्रमाण ठरविण्यासाठीं एका ठराविक अवधीत किती तारे स्फोट पावतात हें माहीत व्हायला पाहिजे. आणि स्फोट पावणाऱ्या अतिनूतन ताऱ्यांची संख्या निश्चितपणें ठरविणें फार कठीण आहे. शिवाय प्रत्येक स्फोटातून किती वस्तु बाहेर फेकली जाईल हें ठरविणेंहि कठीण आहे. ताऱ्यांच्या पोटांत जड मूलतत्त्वें निर्माण होतात ही जड मूलतत्त्वांची उपपत्ति मान्य केल्यास त्या मूलतत्त्वांचें निश्चित संख्यात्मक प्रमाण या मार्गाने ठरविणें फारच कठीण आहे हेंहि मान्य केलें पाहिजे.

विश्वांतील जड मूलतत्त्वांचें संख्यात्मक प्रमाण 'स्थिरावस्था' सिद्धांताला निश्चितपणें ठरवितां येत नाहीं, म्हणून तो सिद्धांत असंभाव्य मानतां येत नाहीं. या सिद्धांताची जड मूलतत्त्वांची उपपत्ति मान्य केल्यास त्या उपपत्तीनुसार मूलतत्त्वांचें प्रमाण निश्चितपणें ठरवितां येत नाहीं, म्हणून ती उपपत्ति खोटी अगर तो सिद्धांत खोटा असें आपल्याला म्हणतां येणार नाहीं. ताऱ्यांच्या पोटांत कांहीं जड मूलतत्त्वें निर्माण होतात ही गोष्ट निर्विवाद आहे. आणि कांहीं तारे स्फोट पावतात हीहि गोष्ट निर्विवाद आहे. आतां हीं मूलतत्त्वें किती व हे तारे किती हें निश्चितपणें माहीत नसल्यास ती उपपत्ति खोटी ठरत नाहीं. म्हणून 'स्थिरावस्था' सिद्धांताचा खरे-खोटेपणा ठरविण्यासाठीं निराळे निरीक्षणात्मक पुरावे शोधले पाहिजेत. या निरीक्षणात्मक पुराव्यांचा आतां विचार करूं.

## निरीक्षणात्मक पुरावे

'उत्क्रांतिवादी' सिद्धांत आणि 'स्थिरावस्था' सिद्धांत यापैकीं कोणता सिद्धांत खरा हें ठरवितांना या दोन सिद्धांतानुसार विश्वाचें स्वरूप कसें असलें पाहिजे हें ठरविलें पाहिजे. 'उत्क्रांतिवादी' सिद्धांताप्रमाणें विश्वाची उत्पत्ति एका निश्चित समयी झाली असल्याकारणानें विश्वांतील सर्व तेजोमेघांचें वय साधारणपणें सारखेंच असलें पाहिजे. उलट 'स्थिरावस्था' सिद्धांताप्रमाणें विश्वाची उत्पत्ति निरंतरपणे होत असल्याकारणाने विश्वाच्या निरनिराळया भागांत निरनिराळया वयाचे तेजोमेघ आढळून आले पाहिजेत. निरीक्षणानें हें ठरविता आलें तर विश्वाविषयींचा कोणता सिद्धांत स्वीकारावयाचा हा प्रश्न आपोआप निकालात निघेल.

पण याखेरीज दुसऱ्या एका कसोटीचा आपणाला उपयोग करतां येईल. 'स्थिरावस्था' सिद्धांताप्रमाणें विश्वांत चोहोकडे तेजोमेघ सारख्याच प्रमाणांत विखुरले आहेत, त्यांची संख्या अंतरानुसार वाढत जात नाहीं. ती अंतराशी समप्रमाणात असल्याची आढळून येते. पण 'उत्क्रांतिवादी' सिद्धांताप्रमाणें ही संख्या अंतरानुसार वाढत जाईल. ती अंतराशीं समप्रमाणांत असल्याचें आढळून येणार नाहीं. भूतकाळांत दूर जावें तसे तेजोमेघ एकमेकाना अधिक जवळ असल्याचे आढळतील.

पहिली कसोटी प्रथम विचारांत घेऊं. तेजोमेघांचीं वयें ठरविताना 'स्थिरावस्था' सिद्धांताविषयी एक गोष्ट प्रथमच स्पष्ट होते. या सिद्धांतानुसार तेजोमेघांचें घनीभवन झाल्यानंतर ते एकमेकापासून लगेच दूर पळू लागतात. याचा परिणाम असा होतो कीं वयस्क (म्हणजे जुने) तेजोमेघ आपल्याला कधींच पाहायला मिळणार नाहींत. कारण तेवढ्या अवधींत ते आपल्यापासून फारच दूर गेलेले असतील. आपल्या दृश्य कक्षेंत जे तेजोमेघ येतील ते अलीकडे उत्पन्न झालेल्या वस्तूपासून तयार झालेले आणि म्हणून नवीन (तरुण) तेजोमेघ असतील. पण वयस्क तेजोमेघ आपल्याला

पाहायला-मिळणार नसले तरी 'तरुण' तेजोमेघामध्यें वयाच्या दृष्टीनें कांही तफावत आहे का हें आपणाला पाहतां येईल. 'उत्क्रांतिवादी' सिद्धांताप्रमाणें अशी तफावत आढळून येणार नाहीं. उलट 'स्थिरावस्था' सिद्धांताप्रमाणें अशी तफावत आढळून येईल.

तेजोमेघांच्या वयांत तफावत आहे कीं नाहीं हें ठरविण्याचा मार्ग म्हणजे त्यांच्या ताऱ्यांच्या वयामध्यें तफावत आहे कीं नाहीं हें ठरविणें होय. हें ठरविण्यासाठीं ताऱ्यांच्या उत्क्रांतीचा इतिहास माहित असावा लागतो. पण दुर्दैवाने आकाशगंगेंतील ताऱ्यांखेरीज इतर कोणत्याहि तेजोमेघांतील ताऱ्यांच्या उत्क्रांतीचा इतिहास आपल्याला निश्चितपणें माहीत नाहीं. पण ही परिस्थिति वाटते तितकी निराशाजनक नाहीं. कारण वाल्टर बाड यांच्या संशोधनावरून असें आढळून आलें आहे कीं ताऱ्यांचे दोन स्वतंत्र प्रकार अस्तित्वांत असून ते नेहमी आकाशगंगेच्या दोन स्वतंत्र भागांत आढळून येतात. हीच गोष्ट इतर तेजोमेघांच्याहि बाबतींत आहे असें बाड आणि हबल यांनीं दाखवून दिलें आहे. या ताऱ्यांना प्रकार १ व प्रकार २ तारे म्हणतात. प्रकार २ तारे लंबवर्तुळाकार (Elliptical) तेजोमेघांत आणि नागमोड्या (Spiral) तेजोमेघांच्या केंद्रामध्यें आढळून येतात; तर प्रकार १ तारे इतर भागांत आढळून येतात. आपल्या 'आकाश'गंगेतील प्रकार २ ताऱ्यांचा उत्क्रांति–इतिहास बऱ्याच तपशीलात माहीत झाला आहे. आकाशगंगेंतील या प्रकार २ ताऱ्यांचा उत्क्रांति–इतिहास आणि इतर तेजोमेघांतील प्रकार २ ताऱ्यांचा उत्क्रांति-इतिहास सारखाच आहे असें गृहीत धरल्यास आपणाला या तेजोमेघांतील ताऱ्यांच्या वयांविषयीं निरीक्षणानें कांहीं निष्कर्ष काढतां येतील. हें कार्य स्टेबिन्स आणि व्हिटफोर्ड यांनीं केलें आहे. त्यांनीं या ताऱ्यांच्या वर्णपटांतील कांहीं निवडक लहरींचें निरीक्षण करून त्यांचा आलेख काढला आहे. या लहरींच्या आलेखावरून असें आढळून येतें कीं हे तेजोमेघ जितके अधिक दूर असतील तितके ते अधिक तांबडे दिसतात. हा अधिक तांबडे दिसण्याचा परिणाम मागच्या लेखांकांत आपण पाहिल्याप्रमाणें तेजोमेघांच्या दूर पळण्यामुळें निर्माण होतो, पण हा परिणाम ओळखण्यासाठीं 'रेड शिफ्ट'चें निराळें एक तंत्र आहे. या तंत्राचा उपयोग केल्यास तेजोमेघ जितके अधिक, दूर असतील तितकें ते अधिक तांबडे दिसतात असें आढळून येतें; तेव्हां असा प्रश्न निर्माण होतो कीं दोन्ही तंत्रांनीं तेजोमेघ अधिक तांबडे दिसत असतील तर या दोन्ही तंत्रामध्यें कांहीच फरक नाहीं कीं काय? या प्रश्नाचा निर्णय लावण्यासाठीं स्टेबिन्स आणि व्हिटफोर्ड यांनीं कित्येक तेजोमेघांच्या वर्णपटांतील लहरींचा आलेख काढून तो 'रेड शिफ्ट'च्या तंत्राच्या परिणामाशी ताडून पाहिला. तेव्हां त्यांना असें आढळून आलें कीं वर्णपटांतील 'अधिक तांबडे' दिसण्याचा परिणाम दूर पळण्यामुळें निर्माण होणाऱ्या 'रेड शिफ्ट'च्या परिणामाहून भिन्न असून त्याचें कारण ते तारेच मुळांत तांबडे आहेत — केवळ दूर पळण्यामुळें ते तांबडे दिसत नाहींत.

आतां आकाशगंगेंतील ताऱ्यांच्या उत्क्रांति – इतिहासावरून असें दिसून येतें कीं उत्क्रांतीच्या प्रारंभींच्या अवस्थेंत तारे अधिक तांबडे दिसतात. यावरून असा निष्कर्ष निघतो कीं दूरच्या तेजोमेघांतील तारे आकाशगंगेंतील ताऱ्यांच्या उत्क्रांति - अवस्थेला अजून पोचलेले नाहींत. हेंच दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें तर हे तारे आकाशगंगेंतील ताऱ्यांपेक्षा वयाने अधिक तरुण आहेत, पण हे तारे दीड अब्ज प्रकाशवर्षें अंतरावर असल्याकारणाने त्यांचें जें स्वरूप आपण आज पाहतों तें वास्तविकरीत्या दीड अब्ज वर्षापूर्वींचें आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. एवढ्या अवधीचा परिणाम वजा केल्यास ते अजून उत्क्रांतीच्या प्रारंभींच्या अवस्थेंत दिसावेत यांत आश्चर्य नाहीं. याचा अर्थ असा कीं या ताऱ्यांचें व पर्यायानें त्या तेजोमेघांचें वय आकाशगंगेतील ताऱ्यांच्या वयाइतकेंच आहे. ही गोष्ट 'उत्क्रांतिवादी' सिद्धांताला बळकटी आणते.

फ्रेड हॉईलना हा निर्णय मान्य नाहीं. त्यांना हा अधिक तांबडे दिसण्याचा परिणाम ताऱ्यांच्या उत्क्रांतीच्या तरुण अवस्थेमुळे निर्माण होतो हें मान्य असलें तरी त्यांच्या मतें ते तारे अधिक तांबडे दिसतात याचें कारण ते **खरोखरीच** तरुण वयाचे आहेत. त्यांच्यापासून निघालेल्या प्रकाशाला आपणाला पोचायला दीड अब्ज वर्षें लागत असल्यामुळें त्यांचें खरें वय दीड










अब्ज वर्षांनीं वाढविलें पाहिजे, हें त्यांना मान्य नाहीं! बरें, घटकाभर त्यांचें हें म्हणणें मान्य केलें तरी जसजसें विश्वांत दूर जावें तसतसे तेजोमेघ अधिक तांबडे कां दिसावेत हा प्रश्न आहे. जसजसें दूर जावें तसतसें खरोखरीच तेजोमेघ अधिक तरुण असतात काय? फ्रेड हॉईल म्हणतात "होय!" आणि त्यांच्या मतें हा केवळ योगायोग आहे! विज्ञानांतून योगायोगाची हकालपट्टी करण्यास निघालेल्या शास्त्रज्ञाने शेवटीं आपल्या सिद्धांताविरुद्ध पुरावा आढळून आल्यानंतर 'योगायोग' पुढें करावा हा दैवदुर्विलास आहे. पण हॉईल यांच्याविरुद्ध मोठा आक्षेप असला तरी त्यांच्या बाजूनें असें म्हणतां येईल कीं स्टेबिन्स आणि व्हिटफोर्ड यांचें वर्णपराविषयीचें कार्य बरेंच जुजबी असून त्याच्यांत अजून मोठ्या उणीवा आहेत. हें काम जेव्हां विस्ताराने पार पाडलें जाईल, आणि 'स्थिरावस्था' सिद्धांताविरुद्ध भक्कम पुरावा सांपडेल तेव्हांच त्यांचे निर्णय मान्य करतां येतील.

पहिल्या कसोटीविषयी निराशा पदरी पडल्यानंतर दुसऱ्या कसोटीविषयी वाचक उत्कंठा बाळगून असतील. पण या बाबतींतहि कांहींशी निराशाच पदरांत पडणार आहे, हें अगोदरच सांगितलें पाहिजे. कारण ज्या पद्धतीनें ही कसोटी पाहिली जाणार आहे ती पद्धति विज्ञानांत अगदीच आधुनिक असून तिला मान्यता मिळून अजून पुरतें एक तपहि लोटलेलें नाहीं. ही नवीन पद्धति म्हणजे रेडियो ज्योतिर्विज्ञाना (Radio Astronomy) ची पद्धति होय. पण शास्त्रज्ञांच्या हातांत पडलेल्या या नवीन हत्याराने अल्पावधीत इतकी आश्चर्यकारक प्रगति केली आहे कीं या साधनाने विश्वांतील पुष्कळ गूढें उकलण्याची शास्त्रज्ञ आशा बाळगून आहेत. म्हणून हल्लीं कांहींशी निराशा पदरांत पडली तरी भविष्यकाळांत या मार्गाने विश्वाच्या कांही मूलभूत समस्या सुटतील अशी आशा बाळगायला हरकत नाहीं.

## रेडिओ ज्योतिर्विज्ञान आणि विश्वाची उत्पत्ति

रेडियो ज्योतिर्विज्ञान विश्वाच्या उत्पत्तीच्या समस्येवर प्रकाश पाडील असें थोड्या वर्षांपूर्वी कुणालाहि वाटलें नव्हतें. पण इंग्लंडमधील जॉड्रेल बँक येथें २५० फूट व्यासाची रेडियो दुर्बीण रचली गेली आणि ही गोष्ट प्रत्यक्षांत उतरली. अर्थात् या कामी आस्ट्रेलियांतील 'मिल्स क्रॉस' आणि केंब्रिजच्या इतर 'मुलार्ड वेधशाळे'च्या दुर्बिणींनीहि बरीच मदत केली आहे. जें काम आरशाच्या दुर्बिणीकडून झालें नाहीं तें रेडिओ लहरींचा वेध घेणाऱ्या दुर्बिणीकडून व्हावें याचें पुष्कळांना आश्चर्य वाटेल. पण त्याचें स्पष्टीकरण सोपें आहे. रेडिओ लहरींच्या साहायाने विश्वांतील सर्वांत दूरच्या तेजोमेघांचा शोध लावणें शक्य आहे. हे तेजोमेघ इतके दूर आहेत कीं हल्ली त्यांचा प्रकाश-लहरींच्या साहायानें शोध लावणें अशक्य आहे. कारण हे तेजोमेघ सर्वांत मोठ्या पॅलोमार येथील २०० इंच व्यासाच्या आरशाच्या दुर्बिणीच्या सुद्धां टप्प्याबाहेर आहेत. केंब्रिजचे प्रसिद्ध रेडिओ ज्योतिष शास्त्रज्ञ मार्टिन राईल यानीं "२०० इंच व्यासाच्या पॅलोमारच्या दुर्बिणीपेक्षा मोठी दुर्बीण तयार करण्याची आतां मुळींच आवश्यकता उरलेली नाहीं," असें जें विधान केल्याचें प्रसिद्ध झालें आहे त्याचा यावरून बोध होईल.*

अजून बाल्यावस्थेंत असलेल्या या तंत्राचा विश्वाच्या उत्पत्तीविषयींची समस्या सोडविण्यासाठीं उपयोग करून घेण्याचें कारण या तंत्राने विश्वांतील सर्वांत दूरच्या भागाविषयींची माहिती मिळविणें शक्य झालें आहे, एवढेंच नाहीं, या तंत्राने विश्वांतील अदृश्य तेजोमेघ शोधून काढणें शक्य असल्यामुळे 'दृश्य' क्षेत्र त्यामुळें अधिक विस्तृत झालें आहे. रेडियो दुर्बिणीचें हें काम आरशाच्या दुर्बिणीला कधीच करतां आलें नसतें. या रेडियो तंत्राच्या साहायाने आतापर्यंत सुमारें २००० अदृश्य आणि अति-दूरचे रेडियो तारे (तेजोमेघ) शोधून काढण्यांत

* याचा अर्थ पॅलोमारच्या २०० इंच व्यासाच्या दुर्बिणीपेक्षा ही २५० फूट व्यासाची रेडिओ दुर्बीण कितीतरी पटीनें मोठी आहे असा मात्र कोणी करूं नये. तुलनात्मक दृष्ट्या पाहिलें तर हल्लीच्या जगांतील सर्वांत मोठ्या (२५० फूट व्यासाच्या) चल रेडिओ दुर्बिणीचें सामर्थ्य फारच तोकडें असून २०० इंच व्यासाच्या पॅलोमार दुर्बिणीच्या सामर्थ्याची बरोबरी करावयाची झाल्यास पृथ्वीएवढी मोठी रेडियो दुर्बीण तयार करावी लागेल!








आले असून त्यांचा विश्वोत्पत्तिशास्त्रांतील सिद्धांतांची कसोटी पाहण्यासाठीं उपयोग करून घेण्यात आला आहे, हें काम कॅंब्रिजच्या मार्टिन राईल यांनीं पहिल्यांदा १९५५ सालीं हातीं घेतलें आणि लगेच ऑक्सफर्डच्या हॅली व्याख्यानामध्ये त्याचे निर्णय जाहीर केले.

'स्थिरावस्था' सिद्धांताप्रमाणें विश्वांतील तेजोमेघ अवकाशांत सारख्याच प्रमाणांत पसरलेले असले पाहिजेत. म्हणजे 'स्थिरावस्था' सिद्धांत खरा असेल तर विश्वांत आपण कितीहि दूर गेलों तरी तेजोमेघांची सरासरी संख्या अंतराच्या समप्रमाणांत असल्याची आढळून आली पाहिजे. उलट 'उत्क्रांतिवादी' सिद्धांत खरा असेल तर ही संख्या अंतराच्या विषम-प्रमाणांत वाढत गेली असल्याची आढळून येईल. २००० रेडियो तेजोमेघांची संख्या आणि अंतर यांच्या प्रमाणाचा राईल यानीं एक आलेख काढला तेव्हां त्या आलेखाची रेषा सरळ न जातां वक्र झाली असल्याची आढळून आली. म्हणजे या आलेखाप्रमाणें तेजोमेघांची सरासरी संख्या आणि अंतर यांचें प्रमाण शुद्ध व सरळ नाहीं. तें अंतराच्या दिशेने विषमपणें वाढत जातें. हा पुरावा असें सूचित करतो कीं, 'स्थिरावस्था' सिद्धांत वर्णन करतो त्याप्रमाणें विश्वाची उत्पत्ति झालेली नसून 'उत्क्रांतिवादी' सिद्धांताच्या वर्णनाप्रमाणें ती झाली आहे.

हा निर्णय कित्येक शास्त्रज्ञांना मान्य नाहीं. आणि ते एकाच कारणासाठीं : हा निर्णय अपुऱ्या आणि अनिश्चित संशोधनावर आधारलेला आहे. हें नवीन रेडिओ तंत्र अजून बरेंच अनिश्चित आहे याविषयी संशय-नाहीं. विशेषतः या रेडियो ताऱ्यांचीं अंतरें निश्चित माहीत नाहींत. तसेंच या ताऱ्यांचा व्यासहि निश्चित माहीत नाहीं. आणि व्यास निश्चित माहीत नसल्यामुळें त्यांची संख्या व स्थानें दूर अंतरावर निश्चितरूपानें ठरविणें कठीण होतें. म्हणून राईल यानीं जो आलेख तयार केला होता तो तितकासा विश्वासार्ह मानतां येत नाहीं.

ही निराशजनक परिस्थिति सुधारण्यासाठीं राईल आणि शॉअर यांनीं रेडियो ताऱ्यांच्या संख्येवरून आलेख तयार करण्याचा मार्ग सोडून देऊन संभवगणिताच्या सहायाने रेडियो-लहरींचा आलेख तयार केला. ही पद्धति वरील पद्धतिपेक्षा अधिक विश्वासार्ह आहे. कारण या आलेखाप्रमाणें रेडियो ताऱ्यांची संख्या व स्थानें माहीत नसतांनासुद्धां त्यांच्या तीव्रतेच्या सहायाने त्यांच्या प्रमाणाची संभवनीयता ठरविता येते. या पद्धतीने तयार केलेल्या आलेखाची तुलना 'स्थिरावस्था' सिद्धांताच्या सैद्धांतिक आलेखाशी केली असतां पुन्हां फरक दिसून आला. पुन्हा विश्व एकजिनसी नसल्याचें आढळून आलें. 'उत्क्रांतिवादी सिद्धांतालाच पुन्हा बळकटी मिळाली.

पण हा कांहीं निश्चित पुरावा मानतां येत नाहीं. न्यूटनचा गुरुत्वाकर्षणाचा सिद्धांत बाजूला सारून सापेक्षता सिद्धांत स्वीकारण्यास जसे निश्चित पुरावे मिळाले होते, तसे हे पुरावे निश्चित नाहींत. रेडियो ताऱ्यांच्या अंतराविषयींचें गृहीतकृत्य चुकीचें ठरलें तर हा पुरावा पूर्णपणें निरुपयोगी ठरतो. पण अगदी अलीकडे ( फेब्रुवारी १९६१ ) राईल आणि कॅंब्रिजचे इतर पांच सहा शास्त्रज्ञ यानीं पुन्हा एकदा आपल्या पूर्वीच्या निर्णयाला पुष्टि दिली आहे. या नवीन संशोधनाप्रमाणें 'उत्क्रांतिवादी' सिद्धांतच बरोबर आहे. या शोधाला इंग्लंडमधील वृत्तपत्रानीं बरीच प्रसिद्धि दिली असल्याची वार्ता आहे. सामान्यतः विज्ञानांतील शोध वैज्ञानिक मासिकांतून प्रसिद्ध होत असतात. पण या बाबतीत राईल यानीं परंपरा मोडून वार्ताहरांची एक बैठक बोलाविली आणि आपला शोध जाहीर केला. वार्ताहरांना दिलेल्या मुलाखतींत राईलनी म्हटलें आहे कीं, त्यांची दृष्टि विश्वात ८००,०००,००० प्रकाशवर्षे अंतरापर्यंत पोचली होती. म्हणजे हे ब्रिटिश शास्त्रज्ञ विश्वाच्या जवळ-जवळ दृश्य मर्यादेलाच जाऊन पोचले होते असें म्हणायला हरकत नाहीं. एवढ्या विस्तृत क्षेत्रावर आधारलेल्या संशोधनाला खचित महत्व आहे.

राईल यानी वार्ताहराना मुलाखत दिली त्यावेळीं 'स्थिरावस्था' सिद्धांताचे प्रमुख पुरस्कर्ते फ्रेड हॉईल हेहि उपस्थित होते. त्याना याविषयीं 'विचारलें' असतां आपल्याला हा निर्णय मान्य नसल्याचें त्यानीं सांगितलें. त्यांच्या मतें 'विश्वांत दूर जावें तसें तेजोमेघांची सांद्रता वाढत असल्याची आढळून येते' या








निर्णयाचा अर्थ असाहि होऊं शकेल कीं विश्वात दूर जावें तसे रेडियोलहरी निर्माण करण्याची तेजोमेघांची शक्ति वाढत जाते. कारण तेजोमेघांची सांद्रता अंतरानुसार वाढत जाते हा निर्णय अंतरानुसार वाढत जाणाऱ्या रेडियो-लहरींच्या तीव्रतेवर अवलंबून आहे. ही तीव्रता तेजोमेघांच्या वयानुसार वाढत असेल तर तेजोमेघांची सांद्रता अंतरानुसार वाढते हा निर्णय चुकीचा ठरतो. पण मग पूर्वीचाच प्रश्न येथेहि उपस्थित होतो: विश्वांत दूर जावें तसे तेजोमेघांची रेडियो तीव्रता व वयें वाढत कां जावींत ? याकरितां हा केवळ योगायोग आहे असें म्हणून हॉईलना पुन्हा स्वतःचा बचाव केला पाहिजे ! ज्यांना 'उत्क्रांतिवादी' सिद्धांत आवडत नाहीं किंवा त्यामधील तत्त्वज्ञानात्मक अडचणीमुळे तो स्वीकारार्ह वाटत नाहीं, त्याना हें रेडियो तंत्र फसवें आहे असें मानून स्वतःचें समाधान करणे शक्य आहे. पण हें रेडियो तंत्र फसवें मानल्यास विश्वाच्या दूरच्या भागाविषयी माहिती मिळविण्याचा आपला हल्लीचा एकमेव मार्ग खुंटतो. शिवाय बहुसंख्य शास्त्रज्ञ रेडियो तंत्रावर विश्वास ठेवणारे आहेत हें लक्षांत ठेवलें पाहिजे. अशा परिस्थितींत मागें उल्लेख केलेल्या वर्णपटाच्या पूरक पुराव्याविषयी अजून बरेंच काम व्हायचें असल्यामुळे या क्षेत्रांत जास्त संशोधन व्हायला पाहिजे आणि ही अनिश्चित अवस्था पूरक पुराव्यानीं नाहीशी केली पाहिजे एवढेंच तूर्त आपल्याला म्हणतां येण्यासारखें आहे.

तूर्त 'उत्क्रांतिवादी' सिद्धांताच्या बाजूने संशोधनाचा कौल असला तरी कांहीं काल प्रतीक्षा-वृत्ति धारण करणेंच एकंदरीत शहाणपणाचें दिसतें.

---











अनुक्रमणिका

श्री. शां. वि. आवळसकर

# छत्रपति संभाजी महाराज– परीक्षण

इ. स. १९६० मध्यें जीं ऐतिहासिक चरित्रें प्रसिद्ध झालीं, त्यांत श्री. वा. सी. बेंद्रे यांचें उपरिनिर्दिष्ट पुस्तक अनेक कारणांनीं उल्लेखनीय झालें आहे. श्री. बेंद्रे यांचा इतिहाससंशोधनाचा व्यासंग चाळीसहून जास्त वर्षांचा आहे. बराच काल इंग्लंडमध्यें राहून त्यांनीं इंडिया ऑफिसमधलीं मराठ्यांच्या इतिहासाचीं ऐतिहासिक साधनें तपासलीं व नकललीं आहेत; सदर नकलांचा प्रचंड संग्रह त्यांच्या हाताशीं आहे व त्यांचा शक्य तेवढा उपयोग या ग्रंथासाठीं त्यांनीं केला आहे. गेलीं अठ्ठावीस वर्षें सतत, संभाजी चरित्र लिहिण्याचा निदिध्यास त्यांना लागलेला आहे. सरकारी मदतीमुळें व अन्य साहाय्यामुळें त्यांच्या पुस्तकांत कोणत्याहि तऱ्हेच्या उणीवा न रहातां हा ग्रंथ नावीन्यपूर्ण, साधार, विवेचक, परिपूर्ण आणि अनेक गुणांनीं भूषित असा निर्माण होईल, अशी अपेक्षा आणि आशा महाराष्ट्रांतील इतिहासप्रेमी वाचकवर्ग आजवर बाळगून राहिला असल्यास तें चूक ठरणार नाहीं.

पण एवढी अनुकूलता मिळूनहि श्री. बेंद्रे यांचें पुस्तक रसिकांच्या व जाणकार संशोधकांच्या आदरास पात्र होणारें नाहीं, हें आरंभींच स्पष्ट लिहावयास आम्हांस अतिशय खेद होतो ! श्री. बेंद्रे यांचें पुस्तक अगदीं सुमार दर्जाचें उतरलें आहे, हें अधिक शोचनीय !

## तत्त्वचिंतन– पण विषयबाह्य !

पुस्तकांतील मजकुरानें एकूण ६७७ पृष्ठें व्यापिलीं आहेत व अनेक प्रकरणें पाडून श्री. बेंद्रे यांनीं आपल्या ग्रंथास आकार देण्याचा प्रयत्न केला आहे. पण या प्रकरणांतून आरंभापासून अखेरपर्यंत एक मोठा दोष निर्माण होत गेला आहे; तो असा कीं प्रकरणाचे आरंभीं बेंद्यांना कांहींतरी विचार, तत्त्वचिंतन व 'पुराण' सुचतें ! त्यांत ते इतके रंगून जातात, कीं सुसूत्र इतिहास सांगण्याचें अवधान सुटतें. उदाहरणार्थ, पृष्ठ ७ वर मावळ आणि कोंकण भागांतील अनार्य व मराठ्यांच्या ९६ कुळी यांच्या वर्णनांत लेखक गुंतले आहेत. या अनार्यांचा व मराठ्यांच्या ९६ कुळांचा संबंध संभाजीचरित्राशीं सुतराम् नाहीं. त्यांनीं 'आचारधर्माची' घडी विस्कटल्याचें, येथें जें वर्णन केलें आहे, तें कशाकरितां हेंहि उमगूं शकत नाहीं. मौज ही कीं हें सगळें वर्णन 'चिन्त्य' आहे ! पृष्ठ ५४ वर पहिलाच मोठा परिच्छेद असाच तत्त्वचिंतनांत खर्ची पडला आहे. पृष्ठ ६४ वर ब्राह्मणांच्या वर्णश्रेष्ठत्वावर लेखक असेंच लिहूं लागले आहेत. पृष्ठ ९२ वर पुन्हा अशीच तत्त्वचिंतनाची ऊर्मि लेखकास आली आहे. पृष्ठ १७२ वर बेंद्रे यांना अशी फार फार मोठी लहर आलेली आढळते. पृष्ठ २१५ ची तीच तऱ्हा झाली आहे. पृष्ठ २४४ ते २५२ वर हें तत्त्वचिंतन अतिरेकास गेलें आहे. ! पृष्ठ ५१२ वर त्याच प्रकाराची पुनरावृत्ति झाली आहे.

ह्या विषयबाह्य तत्त्वचिंतनांत लेखक निष्कारण गुंतल्यामुळें ग्रंथ विस्तारला आहे. आमचे मतें, लेखकानें हें तत्त्वचिंतन, द्विरुक्ति, हे प्रकार टाळले असते, तर ग्रंथ ४५० पृष्ठांत आटोपला असता; त्यास जास्त बांधेसूदपणा आला असता व वाचकांना तो वाचवला असता. आतां, या विस्तारामुळें स्थिति अशी झाली आहे कीं बेंद्रे यांचा हा ग्रंथराज वाचणें ही शिक्षा झाली आहे.

## कर्ता–क्रियापदाचाहि मेळ बसत नाहीं !

तिसरा अतिशय महत्वाचा दोष सर्व ग्रंथांत निर्माण झाला तो असा कीं, बेंद्र्यांच्या लेखनाला भाषेची गोडी मुळींच नाहीं, भाषा अतिशय रुक्ष आहे. भाषा व्याकरणदृष्ट्या अनेक ठिकाणीं अतिशय सदोष आहे; इतकी कीं कर्ता-क्रियापदाचाहि मेळ वाक्यांतून बसत नाहीं. त्यामुळें वाचकाला अर्थबोध होणें अवघड जातें. कन्नड मातृभाषीयानें प्रथमच शिकून मराठी बोलूं लागावें; म्हणजे जो प्रकार होतो, तसा थोडाबहुत








प्रकार बेंद्र्यांच्या भाषेचा झाला असल्यानें, भाषा नादवती तर नाहींच; पण ओघवतीहि नाहीं. बेंद्र्यांनीं शेंकडों ग्रंथ हाताळून हें पुस्तक लिहिलें तेव्हां त्यांना परभाषेंतील ग्रंथांचे उतारे देणें क्रमप्राप्तच झालें. उताऱ्यांचें भाषांतर देतांना बेंद्र्यांचें भाषादारिद्र्य अगदीं उघड झालें आहे. उदाहरणार्थ, पृष्ठ ४७८ व ४७९ वर शेवटून ९ व्या ओळीचे आसपास पहा; पृष्ठ ४८० वर शेवटून ७।८ ओळी व पृष्ठ ४८१ चा प्रारंभ पहा. बुसातीनुस्सलातीन किंवा औरंगजेबनामा मधल्या उताऱ्यांचें बेंद्रेकृत भाषांतर इतकें दरिद्री आहे कीं तें वाचवत नाहीं; त्याचा अर्थबोध होत नाहीं! बेंद्र्यांना मराठींतील अनेक शब्द शुद्ध स्वरूपांत माहीत नाहींत. ते 'हाडयात्रण' ऐवजीं हाडयावर्ण लिहितात, छापतात. त्यांना 'फटकळ' या शब्दाचा ऐतिहासिक अर्थ माहीत नसल्यानें, एका ठिकाणीं त्यांनीं मौजच केली आहे! पृष्ठ १३६ वर हा शब्द आला आहे. पृष्ठ २३ वरील 'ऐक्यता' हा शब्द असाच खटकतो. पृष्ठ २११ वर "प्रथम तो अकबराच्या पलायनाला आळा घालण्याची तोषिस करीत होता," असें बेंद्रे लिहितात. "तोषिस" कीं कोशीस? असे भाषादोष किती म्हणून सांगावेत! एवढया व्यासंगी माणसानें, भाषेच्या दृष्टीनें इतका भिकार, लठ्ठ ग्रंथ आजवर कधींहि निर्माण केला नसेल!

## हे सरदार कोणाचे कोण?

औरंगजेब बादशहाची मराठी राज्यावरील एक मोठी स्वारी व तिचा इतिहास असें या ग्रंथांचें बव्हंशीं स्वरूप आहे. अशा स्थितींत, बादशहाचे सैन्यांत निरनिराळे सेनापति व सरदार होते, त्यांचा उल्लेख ग्रंथांत जागजागीं आला आहे. पण बेंद्र्यांनीं तीं नांवें अशीं वापरलीं आहेत, कीं ते जणुं त्यांचे रोजचे जानीदोस्त! त्यांचा कांहींहि परिचय त्यांनीं वाचकांना करून दिलेला नाहीं. हे सरदार विजापूरकरांचे, गोवळकोंडेकरांचे कीं बादशाही सैन्यांतले, हें कळावयास बेंद्र्यांनीं काहींहि मार्ग उपलब्ध करून दिला नाहीं. त्यांचें कर्तृत्व काय, याचें मोजमाप करावयाचें कांहींहि साधन नाहीं. विष्णुसहस्रनाम आपण भक्तिपूर्वक तरी वाचतों. ही नुसती नामावलि समजून कांहीं उपयोग नाहीं. स्पष्टीकरण व परिचय करून देत देत तीं वापरलीं असतीं, तर बरें झालें असतें. शिवाय, बेंद्रे तीं एकाद्या नुकत्याच, लाहोरकडून आलेल्या पर्शियन पंडिताप्रमाणें वापरणार! ते फत्तेजंग म्हणणार नाहींत; फतहजंग! रुहुल्लाहखान! लुतफुल्लाह! मोहमदशाह! हें कसलें वेड हें? आणि त्याचा उपयोग काय? मराठमोळ्या माणसांसाठीं लिहितांना त्यांना समजेल, पचेल, असें लिहिण्याची जबाबदारी बेंद्रे मानणार कीं नाहींत? मानणार नसले, तर मराठी ग्रंथरचना तरी कोणासाठीं आणि कशासाठीं?

कवींद्र परमानंद आणि त्याचा प्रपौत्र गोविंद यांचे ग्रंथ व बुधभूषण, राजाराम चरितम् यांसारख्या संस्कृत ग्रंथातून आलेला संभाजीकालीन व तत्पूर्वीचा इतिहास श्री. बेंद्रे यांनीं उपयोगांत आणण्याचा प्रयत्न केला आहे. जागजागीं संस्कृत उतारे देऊन लेखकानें थाट उडवून दिला आहे. पण या संस्कृत उताऱ्यांचा अर्थ आपल्या वाचकांना सहज समजेल असें वाटून कीं काय, श्री. बेंद्रे यांनीं त्यांचा सारांश देण्याचेंहि टाळलें आहे! हा तर वाचकांवर फार मोठा अन्याय होय. आम्हांस वाटतें कीं बेंद्र्यांनीं जरूर तेवढा सारांश देऊन उताऱ्यांचा फक्त निर्देश केला असता, म्हणजे त्यांचें काम झालें असतें व वाचकांची सोय झाली असती; पृष्ठसंख्या आटोपशीर झाली असती. पण संस्कृतमध्यें म्हटलें आहे, 'निरङ्कुशाः कवयः।' बेंद्र्यांना तरी हा बोध कोणीं करावयाचा!

अवतरणें देत असतांनाहि बेंद्रे पूर्वसंकेत पाळीत नाहींत. प्रथा अशी कीं अवतरणांत लेखकानें संस्कार करूं नयेत. मूळ उतारा द्यावा; विवेचनांत आपले संस्कार मांडावेत. पण बेंद्रे अवतरणें देतात, तींच संस्कारांसह! हें ठीक नव्हे! उदाहरणार्थ, पृष्ठ २१ ओळ ७, पृ. २२ ओळ २ या ठिकाणीं बेंद्रे यांनीं जेधे शकावलीचे आधार सावतरण दिले आहेत ते पहावेत, म्हणजे आमचें म्हणणें वाचकांस समजेल. हा प्रकार सर्वत्रच झाला आहे.

## लेखकाची भूमिका कोणती असावयास हवी?

ऐतिहासिक अगर शास्त्रीय ग्रंथांत आधारांस अतिशय महत्त्व आहे, हें श्री. बेंद्रे यांसहि मान्य असावें; कारण श्री. बेंद्रे यांनीं आपलें पुस्तक साधार लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. पण त्यांचा दृष्टिकोणच

दूषित असल्यानें या ग्रंथाचें महत्त्व पार नाहींसें झालें आहे ! शास्त्रीय विषयांवरील लेखक हा वकील कधींच असूं शकत नाहीं; त्याची भूमिका न्याया-धिशाचीच असली पाहिजे व सत्यान्वेषण हें त्याचें ध्येय असलें पाहिजे; तसें नसेल, तर ग्रंथ एकतर्फी होईल व विशिष्ट विषयांतील सांगोपांग ज्ञान लोकांपुढें मांडलें न जातां बुद्धिभेद निर्माण होईल, हें उघडच आहे. दोन तपांपूर्वी श्री. बेंद्रे यांच्या मनानें घेतलें कीं संभाजी राजा, बखरकार म्हणतात त्याप्रमाणें सदोष नसून तो निर्दोष व सर्वगुणसंपन्न आहे. या कल्पनेनें भारावून जाऊन बेंद्रे यांच्या संशोधनास प्रारंभ झाला. पण त्याला पूर्ण निर्दोष ठरविण्याच्या भरांत श्री. बेंद्रे यांना सगळ्या पुराव्याचा उपयोग करणें अशक्य होऊन बसलें ! मग त्यांनीं आपल्या बाजूस उपयोगी आणि जुळता पुरावा तेवढाच ग्राह्य मानून या पुस्त-कांत समाविष्ट करून घेतला आहे. संभाजीच्या विरुद्ध पक्षांत असलेल्या सगळ्यांना "नालायक, अप्रामाणिक," ठरविण्याची जबाबदारी माथ्यावर घेऊनच श्री. बेंद्रे लेखनास प्रवृत्त झाले; तसें करणें त्यास भागच पडलें ! एकच उदाहरण येथें देतों. ज्या जेधे शकावलीचा आधार बेंद्रे यांनीं जागजागीं घेतला आहे, तींत आण्णाजी दत्तो, बाळाजी आवजी इत्यादींच्या वधाची नोंद आली आहे. तींत, ' कबजीच्या बोलें मारिले ' असें स्पष्ट विधान आहे. लेखकानें तें म्हणणें कोणत्या छुप्त वेदांच्या आधारें अमान्य केलें कोणास ठाऊक; या व्यक्तींचा संबंध त्यांनीं शहाजादा अकबराबरो-बरच्या कटाशीं जोडला आहे. संभाजी विरुद्धच्या पक्षांत बरीच मंडळी ' ब्राम्हण ' असल्यानें लेखक ब्राम्हणांच्या वर्णश्रेष्ठत्वावर घसरला आहे. आण्णाजी दत्तोस त्यांनीं अप्रामाणिक ठरविलें आहे ( पृ. ६४ ). पण असें ठरविण्यास पुरावा देण्याचें त्यांनीं टाळलें आहे. सबंध ग्रंथांत, शिवकालीन ब्राह्मण कारभाऱ्यांवर आग पाखडण्याचें काम अखंडपणानें करणारे बेंद्रे पृ. ६५ वर, त्यांनीं संभाजीची अप्रतिष्ठा केली असें म्हणतात. पृ. १२९ च्या टीपेंत रामचंद्र नीळकंठ नाकर्ता असल्याचें आपलें व शिवाजी राजांचें मत सांगतात ! पृष्ट ४६६, ४७५ वर त्यांनीं रामचंद्र नीळ-कंठावर जोरदार हल्ले चढविले आहेत. बेंद्र्यांनीं बिचाऱ्या मोरोपंत ( पृ. १०७ ते ११० ) पिंगळे, प्रल्हाद निराजी, रघुनाथपंत हणमंते ( पृ. ५१६, ५१८, ५२२ ) यांसहि इतकें झोडपून काढलें आहे कीं ब्राह्मण तेवढे निमकहराम, अशी जणुं आरोळीच ठोकली आहे ! आणि हें सगळें इंग्लिश ग्रंथकार फ्रायर सारख्या मराठ्यांच्या कट्टर वैऱ्याच्या शब्दांवर व इंग्रजांच्या ऐकीव मजकुराच्या पत्रांवर विसंबून ! शत्रु-पक्षीयानें लिहिलेल्या मजकुरांतून किती बाद कराव-याचें, हें ज्यास उमगलें नाहीं, त्यानें इतिहास लिहि-ण्यास लेखणी हातीं धरूं नये किंवा टंकयंत्रापुढें लेखनास बसूं नये ! काफीखानानें शिवछत्रपतींच्या मृत्यूबद्दल लिहिलें आहे, " काफर बजहान्नम् रफ्त ! " आम्ही म्हणतों, बेंद्रे हें विधान शेंकडा शंभर मान्य करणार का ? वाक्य समकालीन आहे ! मान्य न करतां तरतम-भावानेंच जर अशीं विधानें ते स्वीकारणार असतील, तर त्याला कांहीं अर्थ आहे. पृष्ठ १००, १०१ व १०३ वर पहा; म्हणजे मराठ्यांच्या शत्रुपक्षांतील लेखक फ्रायर याची केवढी मातब्बरी बेंद्रे मानतात तें कळून येईल. आणि बेंद्र्यांनीं घेतलेल्या उताऱ्यांवरूनच फ्रायर अत्यंत कलुषित वृत्तीनें लिहितो हें उघड होत आहे. सारांश, बेंद्र्यांचे ग्रंथाधार दुबळे, पक्षपाती व खोडसाळ आहेत; त्यामुळे ग्रंथाची विरी पार गेली आहे. बेंद्र्यांना आधारांचें मूल्यमापन जमलें नाहीं.

## शिवाजीराजांना माणसांची परीक्षा नव्हती काय ?

ब्राह्मण कारभाऱ्यांनीं वाईट नसावें हें ठीक आहे. ते वाईट असणें शक्य आहे, हें बेंद्र्यांचें म्हणणें आम्ही क्षणभर मान्यहि करूं. पण आम्ही याबाबत एक मह-त्त्वाचें गमक मानतों. मोरोपंत, आण्णाजी दत्तो, रघु-नाथपंत हणमंते, प्रल्हाद निराजी हीं शिवकालीन माणसें खरोखरच नालायक असतीं, तर शिवाजी-राजांनीं त्यांना महत्त्वाच्या जागीं ठेऊन स्वातंत्र्यसन्मुख राष्ट्रांत नांदविलें असतें काय ? त्यांना माणसांची परीक्षा नव्हती काय ? या माणसांनीं थोरल्या राजांच्या खांद्याला खांदा लावून वीस वीस वर्षें जी राष्ट्रीय सेवा केली, ती काय बेंद्र्यांच्या शब्दांनीं पुसली जाणार आहे व ते पुरुष हरामखोर ठरणार आहेत ? याबाबत बेंद्र्यांनीं आपलें म्हणणें एकतर नीट मांडलें नाहीं, त्यांना मांडतां आलें नाहीं असें म्हणावें लागेल; किंवा








ते कांहीं हेतूनें अशी बाजू मांडण्याचा, अनिच्छेनें पण जोरदार प्रयत्न करीत आहेत. हीच गोष्ट रामचंद्रपंत अमात्याचीहि होय. राजारामाचे कालांत मोगली स्वारी परतवण्यासाठीं त्यानें जे प्रयत्न केले व प्रोत्साहन दिलें आहे; त्यांत, आमचे मतें, बेंद्र्यांनीं मानलेले त्याचे दोष पार धुऊन गेले आहेत. ते मानतात तेवढे पंत क्षुद्र नाहींत, हें परिणामांनीं सिद्ध झालें आहे.

## युद्धविषयक चित्रण अपुरें

संभाजीची कारकीर्द म्हणजे अनेक युद्धांचा इतिहास होय. (१) संभाजी-पोर्तुगीझ युद्ध (२) शिद्दी-संभाजी लढा (३) मोगल-संभाजी पहिली मोहीम (४) आदिलशहा-मोगल संग्राम (५) कुत्बशहा-मोगल झुंज (६) संभाजी व मोगल यांच्या युद्धाचें दुसरें पर्व, अशीं किमान सहा युद्धें नऊ वर्षांत झालीं. लेखकानें यांपैकीं एकाहि युद्धाचा नकाशा-आराखडा दिला नाहीं; कालपट दिला नाहीं; युद्धक्षेत्र सांगितलें नाहीं. यामुळें या युद्धांचें बेंद्रेकृत वर्णन इतकें रटाळ झालें आहे कीं त्यापासून रसनिष्पत्ति नाहीं. ' युद्धस्य कथाः रम्याः ' असें कोणीसें म्हटलें आहे. पण येथें पहावें तों प्रत्येक युद्धकथारूप धेनु अगदीं भाकड आहे ! या बाबतींत बेंद्र्यांनीं उच्चांक केला आहे. बेंद्रे यांनीं संभाजी गनिमी काव्यानें लढत असल्याचें म्हटलें आहे; पण गनिमी काव्याच्या युद्धपद्धतीचें तरी त्यांनीं विवरण, विवेचन करावयाचें होतें ! निदान या विशेष युद्धपद्धतीचें ज्ञान तरी वाचकांस झालें असतें पण येथें बेंद्रे गप्प राहिले आहेत.

## कांही चांगल्या गोष्टी

येथवरच्या लिहिण्यावरून वाचकांस असें वाटण्याचा संभव आहे कीं आम्हांस या पुस्तकांत नवीन, आदरणीय असें कांहीं दिसलेंच नाहीं; तसें नव्हे. बेंद्रे यांनीं अनेक नव्या गोष्टी या पुस्तकांत प्रथमच मांडल्या आहेत. (१) पृष्ठ ४३,४४ वर शिवाजी राजांची सुटका व जयसिंहाचें शिवाजी विरुद्ध कारस्थान, ही हकीकत प्रथमच, वाचकांपुढें येत आहे. (२) इ. स. १६७९ मध्यें कच्छवाह रजपूत कन्या चंपा हिच्याशीं झालेल्या संभाजीच्या विवाहाची हकीकत वाचकांस बेंद्रेच प्रथम उपलब्ध करून देत आहेत. (३) शहाजादा अकबर प्रकरण बेंद्रे यांनीं सविस्तर दिलें असून अकबरानें उत्तरेस दिल्लीकडे बंड उभारण्याचा रचलेला डाव प्रथमच ज्ञात होत आहे. यामुळें संभाजीबद्दलचा आदर निश्चित वाढतो. (४) धनाजी जाधवाच्या उदयाची हकीकत श्री. बेंद्रेच वाचकांसमोर ठेवीत असून, ते वाचकांच्या ज्ञानांत नवी भर घालीत आहेत. (५) आदिलशाही व कुत्बशाहींतील बऱ्याच हकीकती प्रथमच समजून येत असून संभाजीची कारकीर्द थोडी अधिक स्पष्ट होत आहे. याकरितां बेंद्रे यांच्या या ग्रंथलेखनाबद्दल अवश्य धन्यवाद दिले पाहिजेत.

सारांश, बेंद्रे यांनीं संभाजीचें शौर्य, राष्ट्रप्रेम, सेनापति या नात्यानें कौशल्य, धर्माभिमान या गोष्टी स्पष्ट केल्या आहेत. तो सर्वगुणसंपन्न असल्याचा त्यांचा अट्टाहास फुकट आहे. संभाजीच्या चारित्र्यास लागलेला स्त्रीविषयक कलंक पुसून टाकणें त्यांस मुळीच शक्य झालेलें नाहीं व त्याचा शिवकालीन प्रधान मंडळाशीं असलेला हेवादावा अन्याय्य होता, असें मानण्याकडेच अजून कल होतो.

बरेच दिवस गाजत असलेल्या या पुस्तकानें अप्रत्यक्षतः एक मोठी कामगिरी बजावली आहे. ती अशी कीं, भारत इतिहास संशोधक मंडळांतील श्री. ग. ह. खरे, श्री. शं. ना. जोशी आदींचें संभाजीकालीन इतिहासाचें संशोधन, बेंद्र्यांच्या पुस्तकामुळें प्रगत होऊं लागलें आहे; हा काय थोडा फायदा झाला !

(येथपर्यंत श्री. बेंद्रे यांच्या ग्रंथांतील कांहीं गुण-दोषांचें दिग्दर्शन केलें आहे; वरील एक विधान असें कीं बेंद्रे यांना मराठी भाषा अर्थवाही स्वरूपांत लिहितां येत नसल्यानें ग्रंथ समजणें अवघड झालें आहे.) श्री. बेंद्रे यांच्या एकूण भाषेचें स्वरूप समजण्याच्या दृष्टीनें पुढील काहीं उदाहरणें पाहावींत; म्हणजे बेंद्रे यांचें मराठी वाचकांस समजेल.

(१) पृ. ५५ "जिजाबाईसाठीं पाचाडाजवळ एक मैलावर स्वतंत्र घडी बांधून ठेविली होती." (२) पृ. ६६ "कारण शिवाजीराजे यांची ब्रह्मनिष्ठत्वाची हळुवार परंपरागत वृत्ति असल्या मंडळींना कठोर शासन देण्यास तयार होत नव्हती ...... या **अंतर्बहिर** कलहांत कुटुंबांतील वरिष्ठ आपल्या कुटुंबांतील माणसांवरील विश्वास व जिव्हाळा यामुळें त्यांनाच आवरण्याचा अधिक प्रयत्न करितो." (३) पृ. ६८












" कलशाभिषेक. " ( ४ ) पृ. ७० " आतां शिवाजीला कोल्हापूरच्या ७ कोसांवरील संगमापासून ते थेट समुद्रापर्यंतचा मुलूख मोकासा म्हणून पातशहानें दिला आहे." ( ५ ) पृ. ७१ " पत्राच्या मतितार्थाचा सारांश असा कीं." ( ६ ) पृ. ७३ " मोगली व आदिलशाही सैन्यांच्या मोठ्या उलाढाली होत असल्यामुळें. " ( ७ ) पृ. ७३ " तोंपर्यंत पित्यापुत्राची भेटहि झाली नव्हती. " ( ८ ) पृ. ७३ " आततार्ई जो यवन त्या आपल्या ऐश्वर्याचीहि उपेक्षा करून त्याचें अनुसरण करतो. " ( ९ ) पृ. ७६ " संभाजी राजांनीं आपला बेत गुप्त ठेवून आपल्या मनस्तापापासून मुक्त होण्यासाठीं शत्रूच्या गोटांत जाऊन तेथील धोका किंवा दगाफटका सहन करण्याची मनाची तयारी केली. " ( १० ) पृ. ७७ " निष्कारण अवमानाचे किंवा अवहेलनेचे मनावरील दुष्ट परिणाम प्रेमबंधनामुळें जर क्रूर सूडाचे भावनेंत अंकुरित होऊं न शकले तर ते अविचारी आत्मयज्ञांत रूपांतरित झाल्यावांचून राहात नाहींत. " ( ११ ) पृ. ७७ दिलेरखानानें आपले लोक पाठवून तेथून त्यास स्वागतपूर्व मोगली गोटांत न्यावें. " ( १२ ) पृ. ८६ " साबाजी याजला तीराची जखम लागली व पन्नास घोडे, चार उंट व पन्नास बैल इतकी लूट साबाजीच्या हातीं लागली. " ( १३ ) पृ. ११० " संभाजी राजांना कारभार मिळेपर्यंत बालयुवराज म्हणून आईबापाला खूष करण्याकरितां कौतुक करणारे वृद्धमंत्री बालयुवराज त्यांच्याविरुद्ध तक्रारी ऐकूं लागतांच अपमानाच्या तीव्र वेदना देऊं लागतात. " ( १४ ) पृ. १११ " उत्तर पेशवे कालांत विधिनिर्मित राज्यसंस्था मोडण्याचे जे प्रयत्न केले गेले व शाहूराजानंतर राजाभिषेक करण्यांत जी खळमळ केली ती या बखरकारासमोर होती. ज्या डावपेचांनीं मध्यवर्ती सत्ता पेशव्यांनीं आपलेकडे घेण्याचा प्रयत्न केल्यामुळें इतर बलवत्तर सरदारांनीं आपापले स्वतंत्र सुभे करण्यांत जी घटना त्यांनीं अनुभवली ती त्यांचेसमोर होती." ( १५ ) पृ. ४५९ " इंग्रजांविषयीं नाराज होण्यास जें कांहीं कारण होत असे तें म्हणजे सिद्दी व मोगली आरमाराच्या बाबतींत. " ( १६ ) पृ. ४६३ " त्यांतूनहि हा राजा बालवयी असला तर तो कपटी आणि बलवान प्रधानमंत्र्यांचें बाहुलें म्हणूनच त्याला अस्तित्व राहतें. " ( १७ ) पृ. ५९८ " रिकामें राहिलेलें शिर्क्यांचें सरदेशमुखीचें इनाम नंतर राजारामानें खंडोबल्लाळास दिल्यानें मात्र शिर्क्यांचें राजकीय अस्तित्व त्या भागांतून नाहींसें झालें होतें हें खरें. " ( १८ ) पृ. ६५१ " परंतु संभाजी राजांच्या कारकीर्दींत हें युवराजपद राजारामाला द्यावयाचें तर सुरुवातीसच लोकांनीं त्यास बाहुलें करून नाचवण्याचा प्रयत्न केल्यानें व राजाराम तितकासा त्या कामाला अनुभवी व कंटक नसल्यानें त्याची युवराजपदीं नेमणूक होऊं शकली नाहीं. " ( १९ ) पृ. ६५९ " संभाजी राजे पकडले गेले असें समजतांच शेख निजामावर स्वारी करून व बादशहाच्या तंबूचे कळस काढून आणण्याचा यशस्वी प्रयत्न केला. " ( २० ) पृ. ६५९ " राजाराम परत येतांच त्यानें आपलें पहिलें कार्य म्हणजे शाहूची सुटका हें होय असाच त्याचा निग्रह असल्याचें स्पष्ट दिसतें. " ( २१ ) पृ. ६७० " अवघ्या वर्ष सहा महिन्यांच्या कालांत पुराण्या आणि समर्थ अशा आदिलशाही व कुत्बशाही राज्यांचा बली घेणाऱ्या अवाढव्य इस्लामी राज्यसत्तेला सतत नऊ वर्षें झुंजवित ठेवून व तिच्या शक्तिसामर्थ्याचा अतोनात नाश करून तिला हिंदवी स्वराज्यापासून दूर ठेवणारा, केवळ डोंगराळ व जंगली कोंकणपटीचा असमृद्ध अल्पवयी तरुण राजा, संभाजी युद्धकुशल आणि कर्तबगार असल्याची साक्ष तत्कालीन हिंदु, मुसलमान, फ्रेंच, पोर्तुगीझ, अरब व इंग्रज सर्वांनाच प्रत्यक्ष पटली असल्यास नवल काय ? "

एकाद्या जागीं जरा शांतता व समाधान लाभेल म्हणून आडवें व्हावें; पण हल्ला करून येणाऱ्या ढेकणांनीं हैराण करावें, तसें बेंद्र्यांच्या भाषेमुळें झालें आहे. हीं उदाहरणें केवळ वानगीदाखल दिलीं आहेत. मुद्रितें नीट न तपासल्यामुळें किती शेंकडे चुका झाल्या आहेत कोणास ठाऊक ! काय करावें ! बेंद्रे काय लिहितात हेंच समजत नाहींसें झालें आहे ! कांहीं वाक्यांत कर्ता नाहीं; कांहींत क्रियापद नाहीं ! असलें कसलें मराठी हें ! अशा चमत्कृतिपूर्ण मराठी मजकुरांत इंग्रजी उतारे आले आहेत, संस्कृत व हिंदी उतारे दिले आहेत; कांहीं ' घेडगुजरी ' भाषांतरें आहेत. संपूर्ण ग्रंथच भाषादोषांनीं डागळलेला असल्यानें अर्थनिष्पत्ति सुलभतेनें होऊं शकत नाहीं.










## श्री. बेंद्रे यांनी लढवलेले कांही तर्क

बेंद्र्यांचे तर्कहि कांहीं जागीं मोठे अजब वाटतात. (पहा–१) पृ. ६४१ " नंतर राजारामास द्यावयाच्या नजराण्याबद्दल मजकूर येतो तो : " we also send you the Persian horse for ye Present to Rama Raja whose youth size and shape we doubt not will make him very acceptable and not with standing his cost (400 pagodas)... " येथेंहि राजारामाच्या शरीरयष्टीचा पर्यायानें उल्लेख येतो.

घोड्याच्या आकारावरून राजारामाची शरीरयष्टी पर्यायानें ठरविणारे बेंद्रे धन्य आहेत.

(२) पृ. ३६ " सारांश, सईबाई आजारपणामुळें पुरंधरावरून आपल्या माहेरीं प्रतापगडावर आली व ती तेथेंच अफझलखान-वधप्रसंगापूर्वी दोन सव्वादोन महिनेच निवर्तल्यानें संभाजी राजे कांहीं दिवस आपल्या आजोळींच होते. "

सईबाईचें सासर पुरंधरावर होतें हें म्हणणें ठीक आहे; पण माहेर प्रतापगडावर होतें, हें म्हणणें और आहे. प्रतापगड हें तिच्या सासरच्याच ताब्यांतलें ठिकाण होतें ना ?

(३) पृ. ६८ " संभाजी राजानीं अण्णाजीपंतास ३ नवंबर १६७८ ला पत्र लिहिलें आहे. तें असें : " मशुहुरल हजरती राजमान्य राजश्री अनाजीपंत सचीव यासिप्रति राजश्री संभाजी राजे दंडवत उपरि रा सदानंद गोसावी यांस निम्रमध्यें इनाम होता. तो सांप्रत मना केला आहे. त्यावरुन गोसावी यानीं आम्हास सांगोन पाठविलें कीं आमचा इनाम जैसा चालत होता तैसा चालता केला पाहिजे. यैसियास हा मामला कांहीं आम्हास दखल नाहीं. याकरितां तुम्हास लिहिलें असे. तुम्हास कळेल तें याचें पारपत्य केलें पाहिजे. बहुत लिहिणें तरी तुम्ही सुज्ञ असा. छ २७ रमजान सु॥ तिसा सबैन अलफ "

आमचे मतें हा उतारा अगदीं सरळ आहे; त्यांत आक्षेप घेण्यासारखें व आण्णाजीपंत व संभाजी या दोघांबद्दल कांहीं ' वेगळें ' वाटण्यासारखें काय आहे ? यांत मंत्र्याविरुद्ध कोणती तक्रार बेंद्रे समजतात कोणास ठाऊक ! आणि संभाजीनें कोणती तक्रार दूर केल्याचें बेंद्रे मानतात हेंहि कळत नाहीं.

(४) शिवाजी राजे शके १६०२ चैत्र शु॥ १५ रोजीं म्हणजे जंत्रीप्रमाणें ३ एप्रिल १६८० रोजीं निधन पावले. ही तारीख ध्यानांत घेऊन पुढील मजकूर पहावा—

पृ. १७६ " अथ कृताग्निसंस्कारा महाराजस्य धीमतः। पुरोहितप्रभृतयो मन्त्रिणो मन्त्र कोविदाः ॥१॥ प्रातर्द्वितीय दिवसे राजारामस्य मातरम्। ममता नाम दैत्यानां मायां कार्यार्थमागतम् ॥ २ ॥ "

या उताऱ्याच्या आधारानें श्री. बेंद्रे म्हणतात कीं १६ एप्रिलला मंत्र्यांनीं सोयराबाईची भेट घेतली. ३ एप्रिलचे लगेच पुढला दिवस १६ एप्रिल ठरविण्यांत बेंद्र्यांचा कांहींतरी हेतु असला पाहिजे असें मनांत येतें ! बहुधा १०।१२ दिवसांची वाढीव मुदत आण्णाजी दत्तोला ' कटांत ' सामील होण्यासाठीं बेंद्रे देत असावेत !

उतारेच उतारे देत बसण्यानें काय होणार ! संभाजीचें चरित्र सरळ सांगण्याचा हेतु न ठेवतां वाक्यावाक्यांतून छद्म पेरीत पेरीतच ज्यांनीं लेखणी चालविली आहे, त्यांना या उताऱ्यांचें काय ! बेंद्र्यांनीं आधार सूचित केले ते सुद्धां सरळपणानें सुचविलेले नाहींत ! संदर्भग्रंथ-सूचींत दिलेले संक्षेप त्यांनीं सर्वत्र पाळलेले नाहींत.

एवढ्या पावणेसातशें पानांच्या लठ्ठ ग्रंथावर टीका खरडीत बसण्यास सवड नाहीं आणि जरूरीहि नाहीं. इ. स. १६७८ ते १६८१ या तीन वर्षांची संभाजीची जीवनकथा आमचे मतें आक्षेपार्ह आहे. संभाजी राजे मोगलांस जाऊन मिळाले–बापाचा पक्ष सोडून गेले हें सत्य लपविणें बेंद्र्यांस अशक्य आहे. शिवाजी राजे एक स्वतंत्र राज्यसंस्थापक युगपुरुष आहेत. त्यांचेविरुद्ध जाऊन संभाजीनें शत्रूच्या पक्षास सामील होण्यांत कोणाचाच भलेपणा राखलेला नाहीं. याबाबत जीं जीं विधानें बेंद्रे पुढें मांडतात, तीं तीं या अद्वितीय पुरुषाच्या चरित्रास अन्याय करणारीं आहेत, हीं गोष्ट विसरतां येत नाहीं. थोरल्या छत्रपतींचें सर्वविध श्रेष्ठत्व स्पष्टपणें नाकारून मगच त्यांना तसें म्हणतां येईल. तें जोवर ते नाकारीत नाहींत, तोंवर या लटपटीची दखल घेण्याचें आमचे मतें कारण नाहीं.

आण्णाजी दत्तो, मोरोपंत, बाळाजी आवजी इत्यादि शिवकालीन माणसें संभाजीचा पक्ष न धरतां, आरंभी, राजारामाचे पक्षास अनुकूल झालीं, यांत त्यांचें कांहीं चुकलें असें आम्हांस वाटत नाहीं. त्यांनीं थोरल्या राजांच्या अलिखित आज्ञा पाळल्या व ते त्यांशीं राजनिष्ठ राहिले असें आम्हांस वाटतें. त्यांची वर्तणूक सुसंगत आहे. कसें तें पहा– ( १ ) शिवाजी राजांनींच संभाजीस पन्हाळयावर नजरकैदेंत ठेविलें. ( २ ) राजारामाची मुंज व लग्न या समारंभास त्यांनीं त्यास रायगडावर आणलें नाहीं. ( ३ ) आपल्या आजारांत त्यास आपल्या भेटीस येण्यास त्यांनीं आदेश दिला नाहीं. ( ४ ) आपलें मरण जवळ येत आहे असें कळतांच त्यांनीं मोरोपंत पिंगळे, आण्णाजी दत्तो दूर होते; त्यांस तातडीनें जवळ बोलाविलें; पण संभाजीस बोलाविलें नाहीं. ( ५ ) राजे अंतसमयीं सावध होते. संभाजीस गादी देण्याची इच्छा त्याहीवेळीं त्यांनीं प्रकट केली नाहीं; त्याला कैदेंतच कटाक्षपूर्वक राहू दिलें.

या सर्व गोष्टी क्रमानें घडल्या आहेत व त्यांतील वैचारिक धोरण एकच आहे. संभाजीवरील थोरल्या राजांचा राग पाहून संभाजीस गादीवर न बसविण्याचा निर्णय ज्यांनीं घेतला, ते एकप्रकारें त्या थोर पुरुषाचीच आज्ञा पाळीत होते; याशिवाय अन्य सुसंगत तर्क कोणता असू शकेल ? हंबीरराव मोहिते संभाजीकडे वळला व वरील मंडळींचा बेत कोलमडला, यांत द्रोह आमचे मतें हंबीररावाचा आहे. त्याला छत्रपतींची कृति व विचारसरणी माहीत असून तो सर्वांविरुद्ध जातो, यांत आमचे मतें, मोहितेच दोषी होत. विजय संभाजीचा झाला व त्याला गादी मिळाली; त्यानंतर जर त्याचेविरुद्ध कोणी गेले असतील, तर त्याबद्दल जें काय म्हणावयाचें तें दोष देऊन म्हणावें. पण आमचे मतें पहिला कट, दुसरा कट, ही भाषा चूक आहे. पहिला कट नव्हताच; तें मागील अंकावरून पुढें चालू असलेलें कथानक होतें व त्याचा प्रेरक छत्रपति शिवाजी राजाच होता.

राजकीय पुरुषाच्या योग्यतेचें मूल्यमापन करतांना, त्याच्या कर्तबगारीचें जें प्रधान अंग असेल तें ध्यानीं घेऊन लिहिण्यांतच प्रामाणिकपणा आहे. बेंद्रे यांचे दृष्टीनें अण्णाजी दत्तो हा एक शिवकालीन नालायक मनुष्य होता. अण्णाजीचें कर्तृत्व कोणत्या गोष्टींत दृष्टोत्पत्तीस येतें, हें पहाणेंच येथें न्यायाचें होईल. निजामशाहींत मलिकंबर, मोगलाईत तोडरमल्ल व मराठेशाहींत अण्णाजी दत्तो हे तिघे जमीनमहसुलाची पद्धति निर्माण करणारे म्हणून प्रसिद्ध आहेत. अण्णाजीचें मोठेंपण त्याच्या महसूलपद्धतींत आहे व ती त्यानें शिवशासित बहुतेक सर्व प्रदेशास लागू करून आपलें मोठेंपण सिद्ध केलें आहे. चौलचा सुभेदार असतां त्यानें कोंकणच्या प्रदेशांतील खेडीं, दर्यागर्क-नदीगर्क जमिनी, खाजणें, खारी मोजल्या. डोंगर उताराची वरकस जमीन मोजली. घाटावर व अन्यत्रहि त्यानें तोच प्रकार अमलांत आणून प्रजाभाग व राजभाग ठरविले; नक्त व ऐनजिनसी महसूल ठरविला. त्यानें शिवकालांत निर्माण केलेली ही व्यवस्था इंग्रजी अंमल होईपर्यंत अगदीं थोड्या फरकानें कायम राहिली. ज्यानें घालून दिलेली एक विशिष्ट पद्धति-व्यवस्था-अनेक पिढ्या अढळ रहाते, तो नालायक असूंच शकणार नाहीं ! बेंद्रे यांना, अण्णाजी दत्तो हा संभाजीचा विरोधी म्हणूनच केवळ, नालायक वाटतो ! त्याला दूषण दिल्याशिवाय संभाजी भूषणास्पद ठरत नाहीं, असें त्यांस कां वाटावें हें कळत नाहीं. येथें जाहीर रीतीनें सांगण्यास आम्हांस हरकत वाटत नाहीं; आण्णाजी दत्तोबद्दलचे कांहीं अप्रसिद्ध कागद आमच्या पहाण्यांत आले आहेत व ते आमच्या या विधानास ( जमीन महसूलपद्धति ) पोषकच आहेत.

अण्णाजी, हिरोजी, बाळाजी आवजी हीं माणसें कोणत्या मोलाचीं होतीं, हें बेंद्रे यांस माहीत आहे. शिवचरित्र ज्यांनीं वाचलें असेल, त्यांना या व्यक्तींच्या योग्यतेची कल्पना आहे. ही कल्पना उखडून टाकण्यास बेंद्रे यांनीं स्वतंत्र, नवीन पुरावा पुढें मांडणें जरूर आहे.

**स्वभाषेंत उपलब्ध असलेले —**

**आधार त्याज्य कां वाटावेत**

इंग्रज व परके ग्रंथकार महाराष्ट्राचा इतिहास सत्य स्वरूपांत सांगू शकत नाहींत; हें उघड झाल्यामुळेंच महाराष्ट्रांत प्रथम इतिहाससंशोधन सुरूं झालें, विस्तारलें; ही गोष्ट बेंद्रे कां दृष्टीआड करतात ? ते तर

संशोधनाच्या या थोर परंपरेचे वारस आहेत ! मोगल व इंग्रज हे मराठ्यांची हकीकत न्यायबुद्धीनें मांडूंच शकणार नाहींत, या साधार भूमिकेवरूनच जें स्वभाषेंतील आधारांचें संशोधन झालें, तें बेंद्रे यांना त्याज्य कां वाटावें ? त्यांना औरंगजेबनामा, बुसातीनुस्सलातीन, ॲबे कॅरे इत्यादि परके ग्रंथ-ग्रंथकार आज आदरणीय कां वाटावेत ? या ग्रंथकारांनीं संभाजीच्या सान्निध्यांत राहून आपलें लेखन अव्वल दर्जाच्या माहितीवरून केलें, असें मानण्यास कांहीं आधार आहेत काय ? नाहींत ! त्यांनीं मराठी राजकीय क्षेत्रापासून दूर राहून ऐकीव माहितीच्या, स्वतःच्या गैरसमजाच्या व योग्यायोग्य कल्पनांच्या आधारें जें लिहिलें, त्यावर बेंद्रे संपूर्ण विश्वास ठेवतात व मराठी साधनें दूर लोटतात, यांत कोणतें औचित्य ते साधीत आहेत ? साधनांची योग्यायोग्यता ठरविणें आतां ' साधन चिकित्सा ' कारासच अशक्य होऊं लागलें काय ?

संस्कृत काव्यें हा चक्षुर्वै सत्यं इतिहास मानण्याची बेंद्रे यांस प्रवृत्ति झाली आहे. पण त्यांतहि त्यांचा आपमतलब आहेच ! संभाजीचा पुत्रकामेष्टि त्यांनीं जरूर उद्धृत करावयास पाहिजे होता ! संभाजीच्या दरबारांतील शाक्तांचा वरचष्मा त्यांनीं कां सांगितला नाहीं ? त्यायोगें बेंद्र्यांचा संभाजी सर्वगुणसम्पन्न ठरला नसता म्हणून ! संभाजीचें दानपत्र बाजूस टाकणेंच योग्य, या जाणीवेनें त्यांनीं त्याचा वापर केलेला दिसत नाहीं. बखरींवर ताशेरे झाडून वाचकांचें मन त्यांविरुद्ध करून ठेवलें, म्हणजे सभासदास डावलतां येईल, असा बेंद्र्यांचा हिशेब-होरा दिसतो.

दुर्दैव, कीं सर्वविध साधनें उपलब्ध झालीं, परिस्थिति सर्वथा अनुकूल झाली, तपश्चर्यापूर्वक सर्व तयारी झाली; पण एक न्यायबुद्धि तेवढीच नष्ट झाल्यानें बेंद्रे हें कांहीतरीच लिहून बसले ! बेंद्रे, आपण कांहींहि म्हणा; संभाजी शूर, धर्माभिमानी, सेनानी-बहुगुणी होता. पण त्याच्या चारित्र्यावरील स्त्रीविषयक कलंक, त्याची पितृद्रोह वृत्ति व त्याचा अघोर अहंकार यांवर आपण जें पांघरूण घालूं पहात आहांत, तें थिटें आणि फाटकें आहे ! आपल्या थोरल्या पुत्राच्या गुणावगुणांचें मूल्यमापन थोरल्या राजांनीं एका ठिकाणीं केलें आहे [ सभासद. शं. ना. जोशी-आवृत्ति पृ. १०८ ], तेंच आज तरी प्रमाण मानलें पाहिजे !

---







अनुक्रमणिका

श्री. श्री. रा. टिकेकर

# पेशवे दप्तर*

[ दोन विद्वानांच्या सहकार्यानें साधलेल्या प्रचंड ऐतिहासिक कार्याची ओळख ]

पेशवा-दप्तरचें इतर महत्त्व कांहींहि असलें तरी सर जदुनाथ सरकार आणि रियासतकार सरदेसाई यांच्या सहकार्यानें साधलेलें प्रचंड कार्य म्हणून हें ऐतिहासिक ठरेल ! रियासतकारांनीं त्या दप्तरांतले निवडक कागद ४५ खंड मिळून संपादले आणि मुंबई सरकारनें ते छापून थोडक्यांत उपलब्ध करून दिले.[१] ही आज साधी, राष्ट्रीय महत्त्वाची घटना सहज मान्य होते. पण हें कार्य सुरू झालें तेव्हां त्याविरुद्ध इतकी विविध ओरड वर्तमानपत्रांत, सभा-संमेलनांत आणि विधिमंडळांत-माजली होती कीं तिची आज कल्पनाहि यायची नाहीं. इतिहास-जमा झालेला हा वाद उभय इतिहास-कारांच्या कर्तबगारीपैकीं एक असल्यानें त्याचा निर्देश टाळणें किंवा त्याचा थोडक्यांत परामर्ष घेणें रास्त ठरलें नसतें. विशेषतः जदुनाथांचा पुणेंकरांवरील रोष इतका प्रखर कां – दीर्घद्वेषासारखें त्याचें स्वरूप कां झालें, याची उपपत्ति पेशवेदप्तरवादामुळें लागते. म्हणून अप्रिय आणि विस्मृत अशी ह्या प्रकरणाची माहिती सांगितली पाहिजे. मुंबई कायदे कौंसिलचे त्या वेळचे रिपोर्ट हे तर या वादासाठीं अस्सल साधन होत. श्री. वासुदेवराव बेंद्रे यांच्याकडून ही घटना साद्यंत ऐकण्यासारखी आहे. सरदेसायांकडून एतत्संबंधी बोलणें होत होतें तें मला ठाऊक आहे. जदुनाथांच्या पत्रांत "पेशवेदप्तर प्रकरणीं पुणेंकरांची कोल्हेकुई" अनेकदां आली आहे. प्रा. कृ. पां. कुलकर्णी हेहि याबाबतींत थोडे माहितगार होत. आणि महामहोपाध्याय द. वा. पोतदार हेहि जाणकारांपैकींच आहेत. मात्र श्री. बेंद्रे यांच्या इतका तपशील उपरिनिर्दिष्टांपैकीं कुणासच ठाऊक नाहीं. ही साधन-चिकित्सा अशासाठीं केली कीं जदुनाथ आणि सरदेसाई या उभयतांबद्दल मुंबई कौंसिलमध्यें केवढें वादळ निष्कारण ( असें आतां म्हणावयाचें ) माजलें, तें समजावें.

पुण्यांतील पेशवे दप्तरासारखें उपयुक्त दप्तर इतरत्र क्वचितच सापडेल. पेशव्यांकडून राज्यकारभार ब्रिटिशांकडे गेला. त्या वेळेपासून जपून ठेवलेले हे ऐतिहासिक कागदपत्र एक प्रचंड रत्नाकरच म्हणायला हरकत नाहीं. यांतील कागदपत्र "रुमालांत" बांधून ठेवलेले आहेत आणि त्या पत्रांचा अंदाज रुमालांवरून-पुडक्यांवरून-करतां येतो.

| | |
|---|---|
| मराठी रुमाल | २७३३२ |
| इंग्रजी ,, | ७४८२ |
| फार्सी ,, | २९ |
| गुजराती ,, | १२९ |
| एकूण | ३४,९७२ रुमाल |

मि. लोगन व मि. जॅकसन[२] या दोन अधिकाऱ्यांनीं वेळोवेळीं पेशवे दप्तराबद्दल सरकारकडे शिफारसवजा रिपोर्ट धाडले. त्यांत ह्या कागदपत्रांचें विशेष महत्त्व व त्यांचा इतिहासाभ्यासूंना उपयोग-यांचें स्पष्टीकरण आढळतें. मि. जॅकसननीं म्हटलें :—

* श्री. रा. टिकेकर कृत "जदुनाथ सरकार आणि सरदेसाई" ह्या तौलनिक अभ्यासांतील हें तिसरें प्रकरण.

१. प्रत्येक खंडाची माफक किंमत ठेविली होती. सगळे खंड छापून तयार झाले तेव्हां प्रथम रु. १२५ स सबंध ४५ खंड देऊं केले. नंतर ही किंमत रु. ७५ वर उतरविली. आणि अखेरीस अभ्यासूंना हे खंड मोफत वाटले. सध्यां भारत इ. सं. मंडळाकडे यापैकीं बरेचसे खंड विकत मिळतात.

२. A. M. T. Jackson, I. C. S. नाशिक येथें जॅकसन "साहेबां"चा खून झाला तेच हे विद्वान अधिकारी. मुंबईच्या ( रॉयल ) एशिआटिक सोसायटीचे ते कांहीं काळ सेक्रेटरी होते. त्यांचा विविध ( प्राच्य ) विषयांसंबंधी बहुमूल्य ग्रंथसंग्रह सोसायटींत ४-५ कपाटें भरून ठेवला आहे. त्यांच्या व्यासंगाची साक्ष त्यावरून येते.



अनुक्रमणिका







" हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याहि सरकारापाशीं पुणें दप्तराइतकें महत्त्वाचें व स्थानिक भाषेंतलें दप्तर नाहीं. या देशाचा अभ्यास करणारांना हा संग्रह अभ्यासतां यावा - अशी व्यवस्था सरकारनें करावी - हें सरकारचें कर्तव्य होय[3]. "

अशा ह्या ऐतिहासिक रत्नभांडारांत इंग्रजी दप्तरहि समाविष्ट आहे. मात्र तें अधिक पद्धतशीर असल्यानें तें लावणें, त्याची जंत्री, यादी करणें फार सोईचें गेलें. पेशव्यांचा हा पत्रसंभार बहुतेक मोडी लिपींत आहे. तें लिहिणेंच आधीं पुष्कळांना अलीकडे वाचतां येत नाहीं. शिवाय "कोणाकडून कोणास," कधीं व कोठून पत्र लिहिलें याची अचुक माहिती प्रत्येक इंग्रजी पत्रावर असते तशी या मोडी कागदपत्रांवर नसते. म्हणून तारीख ठरविणें ( असल्यास "सुहुर सना" ची इंग्रजी तारीख जमविणें ) हें पहिलें काम आणि कोणी कोणास लिहिलें, हें ठरविणें दुसरें- अशीं कठिण कामें असतात. नांव पूर्ण नसतें. असलेंच तर प्रचारांतलें ( टोपण ) नांव असतें- इत्यादि अडचणींचा उल्लेख अशांसाठीं करावयाचा कीं हें दप्तर व्यवस्थित लावण्याच्या कामीं परकी सरकारच्या अडचणी लक्षांत याव्या !

देशी पंडित नेमून त्याकरवीं काम उरकून घ्यावें तर ब्रिटिशांची साशंकी वृत्ति आडवी आली. मराठे हे इथले पूर्वीचे राज्यकर्ते. त्यांना आपल्या गतेतिहासाची आठवण आपण मुद्दाम कशाला करून द्यावी ? असा व्यवहारी विचार दूरदृष्टीच्या मुत्सद्द्यांच्या मनांत सारखा घोळत होता[4]. शिवाय वतनवाडीचे, देण्या-घेण्यासंबंधीं, जुन्या हक्कासंबंधीं नसते वाद या कागदांमुळें उद्भवले तर "धर्म करतां कर्म ओढवायचें" ही भीति ब्रिटिश अधिकाऱ्यांना सारखी डाचत होती. एक तर हें मराठीराज्य जिंकून घेण्यापेक्षां "पदरांत पाडून" घेतलें होतें; सूक्तासूक्त मार्गांचा विधिनिषेध बाळगला नव्हता. ...... अशा विविध कारणांसाठीं एतद्देशीयांवर हें काम सोपविण्यास ब्रिटिश मन कचरत होतें. सरकारी नोकर निदान उपाधि-धर कुणी असला तर त्यावर विश्वास थोडा-बहुत टाकण्याची तयारी असे. रा. ब. ग. चि. वाड हे तर तिथलेच अधिकारी; रा. ब. द. ब. पारसनिस हे सरकारमान्य म्हणून या दोघानंतर हें पुराणें दप्तर चाळण्याचा मान सरदेसायांनाच मिळाला. सरकारच्या या साशंकी वृत्तीशी तिथला कारकून वर्ग इतका तन्मय झाला होता कीं पुढें सरदेसायांना सरकारनें त्या कामावर नेमलें तरी कोणत्या "रुमालां"ना सरदेसायांचें संपादन लाभावें, हें शेवटीं कारकुनांनींच ठरविलें ! संपादकाच्या वरचे हे सरसंपादक, आपला अधिकार स्वयमेव गाजवीत आणि हा केवळ तर्क नव्हे. सरदेसायांनीं ४५ खंड मिळून पुष्कळसे कागद छापून काढले खरे; पण त्या कचेरींत "सरदेसायांना न दाखविलेल्या कागदांची" वेगळी नोंद करून ठेविली होती ! हे रुमाल संपादकांच्या हातीं पडूं दिले नाहींत. हा कारकुनी कावा मोठ्या बढाईनें मला ऐकायला मिळाला. ती नोंद केलेली वहीहि मी पाहिली ! रोज हवे तेवढे रुमाल संपादकांकडे कारकून आणून पोचवीत. संपादकांनीं स्वतः जाऊन कुठलेहि रुमाल आणावयाचे नाहींत असा "कारकुनी" हुकूम होता !

खुद्द सरदेसायांची नेमणूक कशी झाली आणि तींतहि सरकारनें त्यांच्या जोडीला आपल्या विश्वासाचा एक "अधिकारी" कसा दिला-किंवा प्रारंभीचे चार पांच महिने "हुकुमांतील शाब्दिक अडचणीमुळें कसे व्यर्थ गेले" हा कथाभाग यथाक्रम येईल. पण ह्या सर्व कथनावरून लक्षांत घ्यावयाचें तें हें कीं एकादा म्हातारा चिक्कू इसम आपल्या डबोल्याचें रक्षण करतो-तशा रीतीनें ब्रिटिश सरकारच्या अमदानींत या पेशवे दप्तरखान्याचें रक्षण होत होतें.

विद्वज्जनांनीं, परिषदांनीं, वेळोवेळीं सरकारला विनंती करावी कीं ही ऐतिहासिक साधन-संपत्ति अभ्यासकांना उपलब्ध करून द्यावी. लोकमताला थोडा

---

३. मराठी मार्गदर्शिका- ( एलिनेशन रेकॉर्ड ) गुरुजी-दिघेकृत-पुणें १९३४ ( सरकारी प्रकाशन ) यावर किंमत, नांव, प्रकाशक वगैरे कांहीं दिसत नाहीं. पण ही पत्रिका अत्यंत उपयुक्त आहे. पेशवेदप्तराचे ४५ खंड वाटले, त्यांबरोबर ही मजकडे आली.

४. पुरातत्त्व संशोधन खातें सुरू करण्याच्या वेळचें "कर्झन" चें "मिनिट" पहावें.









अनुक्रमणिका

मान दिल्यासारखें सरकारनें करावें. आणि त्यामुळें विद्यार्थ्यांचें, संशोधकांचें कुतूहल मात्र अधिक वाढावें. न्या. रानडे, न्या. तेलंग व डॉ. सर रामकृष्णपंत भांडारकर अशा विद्वत् श्रेष्ठांच्या सांगण्याचा परिणाम झाला म्हणून असो अगर सरकारी अधिकाऱ्यांच्या शिफारसीमुळें असो, रा. ब. गणेश चिमणाजी वाड यांस पेशवे दप्तरांतील कागद निवडण्याचें काम दिलें. त्यांनीं मोठ्या खटपटीनें विशेष मेहनत घेऊन हें नवें कार्य पुरें केलें. सुमारें ३२ खंड होतील इतकें साहित्य निवडलें, त्याच्या नकला (बालबोध) करविल्या; इंग्रजी सारांश प्रत्येक कलमाचा लिहिला. पेशव्यांचे "मुक्काम" निरनिराळे क्रमवार, सालवार, लिहून काढले; कठिण शब्दांचा कोश तयार केला. सर्व कागद विषयवार, "पेशवेवार" लावले आणि सुमारें ३२ खंड होतील इतकें साहित्य तयार केलें.

पेशवे दप्तरांतील निवडक कागदपत्रांचे ४५ खंड संपादून दिल्याबद्दल सरदेसायांची आपणांस आठवण होते. पण तत्पूर्वी १९ वें शतक संपण्याचे सुमारास रा. ब. वाडांनीं ३२ खंडांचें साहित्य तयार केलें, याची आठवणहि फारशी कोणांस नाहीं. सरदेसायांचे खंड सरकारी छापखान्यांत छापले. पण वाडांचे खंड प्रसिद्धीसाठीं डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटी-कडे सोपविले. दर साल एक अगर दोन खंड याप्रमाणें सोसायटीनें हें कार्य सन १९१४ पर्यंत चालविलें. रा. ब. वाडांचे एकंदर पंधरा खंड मिळून सुमारें साडेचार हजार छापील पानें होतात. त्यांची किंमत अदमासें ३५ रु. भरते. एवढें काम एकट्या वाडांनीं विसावें शतक सुरू होण्यापूर्वीं करून ठेवलें. पुढें सर-देसायांनीं निवडलेले कांहीं कागद वाड-संपादनापैकींच होते. आमच्या इतिहासासंबंधी इतकें श्रेष्ठ दर्जाचें संशोधन करून ठेवल्याबद्दल रावबहादुर गणेश चिमणाजी वाड यांस द्यावे तितके धन्यवाद थोडेच होतील. या पंधरा खंडांचें भाग्य असें कीं ते छापून प्रसिद्ध होण्यापूर्वीं ते "सर्वज्ञ" न्यायमूर्ति म. गो. रानडे यांच्या नजरें खालून गेले. ह्या वाड संपादित खंडांना वेगळा "प्रस्ताव" त्यांनीं ( इंग्रजी ) लिहिला. मुंबई-तील एशिआटिक सोसायटींत वाचलेला प्रबंध ( ता. ३०, जून १९०० ) असेंहि त्या प्रस्तावाचें स्वरूप होतें. डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीच्या वतीनें पारसनिसांनीं हा ( इंग्रजी ) प्रस्ताव स. १९०२ मध्यें प्रसिद्ध केला. "मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष" ( मराठी ) ह्या रानडे यांच्या पुस्तकाच्या नंतरच्या आवृत्तींत ( उदा० चित्रशाळा १९२५ ची आवृत्ति ) परिशिष्ट २ म्हणून ह्या प्रस्तावाचा अनुवाद समाविष्ट केला आहे.

सौभाग्या मागोमाग दुर्भाग्यहि या खंडांच्या वाट-णीस आलें. ते प्रसिद्ध झालेले पहाण्यास खुद्द संपादक रावबहादुर वाड आणि त्यांची जगाला ओळख करून देणारे पदवीधर मुकुटमणि रानडे इहलोकीं राहिले नाहींत. वाडांनीं जमविलेलें, तयार ठेवलेलें साहित्य निरनिराळ्या संपादकांनीं छापवून घेतलें. पहिल्या तीन खंडांना पारस-नीस ४,६ व ८ ह्या तीन खंडांसाठीं के. बी. मराठे लाभले; ५ व ७ हे दोन खंड बापु पुरुषोत्तम जोशी यांनीं संपादिले. काशिनाथ नारायण साने यांनीं ९ व्या खंडाचें काम पाहिलें. चार ( १०-१३ ) खंडांसाठीं पुरुषोत्तम विश्राम मावजी व पारसनीस असे दोघेजण मिळून संपादक होते. या शेवटच्या चारहि खंडाचे प्रकाशक सुद्धां मावजीच आहेत. डे. व्ह. ट्रा. सोसा-यटीचें नांव या चारी खंडांवर नाहीं. इतिहास संग्रहां-तून क्रमशः प्रसिद्ध झालेले १४ व १५ हे खंड पारस-निसांनीं संपादिले.

वाड-संपादित खंडांचें ऐतिहासिक महत्त्व समजावून देण्यासाठीं न्याय. रानडे पुढें आले होते; तेव्हां त्यांची महति वेगळी कशी सांगावी ? पेशवाईच्या सांगोपांग कारभाराची माहिती त्यांत आहे. राजकारणें तर आहेतच; पण सामाजिक गोष्टीहि पुष्कळ आहेत. बाटलेल्यांना शुद्ध करून घेण्याबद्दल शास्त्रीय आधार आहेत; धर्मगुरूंच्या आज्ञा आहेत. जुनी न्याय पद्धत कशी असे याचे प्रत्यक्ष दाखले आहेत. नवी बाजार-पेठ वसवतांना "कौल" ( = अभयपत्र ) कसे देत किंवा सवलती काय मिळत; "नगरशेट"चा मान काय असे— ठिकठिकाणीं देवळें कोणतीं—त्यांचा मान कसा राही; शास्त्रीपंडितांना आश्रय कसा मिळे, अग्रहार देण्याची पद्धत कशी होती. मुसलमानी सुल-तानसुद्धां वेदपाठी दशग्रंथी ब्राह्मणांचा मान कसा राखीत ... अशा अनेक बाबींचीं वर्णनें त्यांत सापड-








तात. परंतु " पेशव्यांचे मुक्काम " म्हणून जी तारीखवार माहिती वाडांनीं जमविली आहे तिचें महत्त्व इतिहासाभ्यासूंना विशेष पटेल. अशी कालसूचि ( = क्रॉनॉलजी ) म्हणजे इतिहासाचा आखीव मार्ग होय. सर जदुनाथांची तर ठराविक रीतच असे कीं वर्ण्य प्रसंगाची आधीं कालसूचि करून ठेवायची. ह्या पद्धतीमुळें कथनांत अचुकपणा येतो. इतर वर्णनांची सत्यासत्यता पारखतां येते. वाडांनीं आपल्या खंडांत पेशव्यांचे मुक्काम दिले आहेत ते–

खंड २– पेशव्यांचे मुक्काम पृ. २१९–५९

" ५– दुसरे बाजीरावाचे मुक्काम व रोजनिशी पृ. ३११–२९

" ७– पेशव्यांचे मुक्काम पृ. ३८१–४४६

" ८– सवाई माधवरावांचे मुक्काम पृ. ३५९–६७

कठिण शब्दांचा कोश रा. ब. वाडांनीं पुरविला ही त्यांची उपयुक्त कामगिरी होय. भारत इतिहास संशोधक मंडळ किंवा हिस्टॉरिकल रेकॉर्डस कमिशन स्थापन होण्यापूर्वी अनेक वर्षे, वाडांनीं हें काम करून ठेवलें असल्यानें त्याचें श्रेष्ठत्व वेगळें आहे. पुढें किती तरी वर्षांनीं माधवराव पटवर्धनांनी फारसी-मराठी कोष[५] रचिला. सरदेसायांच्या पहिल्या कांहीं खंडांचें साहित्य वाडांनींच तयार करून ठेवलें होतें इतकें श्रेष्ठतर कार्य वाडांचें होतें. त्यांत नांव ठेवायचेंच असेल तर " इंग्रजी तारखा " दिल्या नाहींत. असें म्हणतां येईल. इंग्रजी वर्षे देऊन वाडांनीं मुसलमानी महिने व तारखा तशाच ठेवल्या आहेत. मोडकांची " जंत्री " किंवा पिल्ले यांची इंग्रजी जंत्री[६] असले सोइस्कर ग्रंथ रा. ब. वाडांस उपलब्ध नव्हते असें नाहीं. पण इंग्रजी तारखा व महिने ( मुसलमानी तारखा व महिने यां ऐवजीं ) पाहिजेतच अशी निकड तेव्हां नव्हती, हें मात्र खरें.

थोडक्यांत सांगावयाचें तर आम्हींहि राज्यकर्ते होतों–आम्ही राज्य असें केलें–हें दाखविण्यासाठीं उपयोगी असें हें साहित्य होतें. राज्यकर्त्यांची ही कर्तबगारी न्यायमूर्ति रानडे यांना खास महत्त्वाची वाटली. कारण त्या वेळच्या राजकीय वातावरणावर ह्या ऐतिहासिक कागदपत्रांमुळें मोठा फरक पडण्यासारखा होता. हिंदी लोकांना राज्यकारभार करतां येत नाहीं अशी राज्यकर्त्या इंग्रजांची समजूत होती– त्या इंग्रजांना हा स्पष्ट पुरावा मर्मी लागण्यासारखा–क्वचित् झोंबण्यासारखा होता. इतिहासाचा हा लाभ किती ताबडतोब पटणारा होता, याची कल्पना आज आपणांस येणार नाहीं. पण वाडांच्या मेहनतीचें चीज करण्यासाठीं- हस्तलिखित वाचून– त्या कागदपत्रांचा परिचय व्यापक जनतेला करून देण्यासाठीं न्याय० रानडे पुढें सरसावले. यांत सर्व कांहीं आलें. त्या कार्याची वेगळी तारीफ हवी कशाला ?

अशा ह्या पेशवेदप्तराबद्दल इतिहासाभ्यासूंना वारंवार कुतूहल वाटावें, हें साहजिकच होतें. कांहीं तरी करून ह्यांतील दडलेलीं रत्नें जगापुढें यावीं ही स्वाभाविक इच्छा कांहीं विद्वान अधिकाऱ्यांची होती. आपापल्या परीनें त्यांनीं खटपटहि केली. पण इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्डस् कमिशन सारखी सरकारी छत्राखालची संशोधकाची परिषद् जेव्हां या दप्तराबद्दल ठराव करूं लागली तेव्हां मात्र निश्चित कांहीं तरी धोरण ठरविलें पाहिजे; विद्वानांची मागणी फार दिवस थोपवून धरतां येणार नाहीं, हें मुंबईसरकारनें ओळखलें. हिस्टॉरिकल रेकॉर्डस् कमिशन मध्यें या दप्तरखान्याबद्दल ठराव, चर्चा, प्रबंध नाहीं, असें अधिवेशन जाईनासें झालें. इतर इलाख्यांतलीं, संस्थानी अंमलाखालचीं दप्तरें भराभर अभ्यासकांना उपलब्ध होऊं लागलीं पण अग्रेसर असलेल्या मुंबई इलाख्यांतला या बाबत " रिपोर्ट " दर वर्षी अगदीं गुळगुळित असे. पण ही अवस्था फार दिवस चालणें शक्य नव्हतें.

मध्यंतरीं दोन वर्षे मि. हेन्रीफ्रँक्स या ऑस्ट्रेलियन पत्रपंडितानें, त्या दप्तरापैकीं इंग्रजी भाग चाळण्याचें, लावण्याचें पत्करलें. मुंबईच्या ' टाइम्स ' चे हें पुण्याचे प्रतिनिधि. आणि पुणें म्हणजे गव्हर्नरांची पावसाळी राजधानी. उन्हाळी राजधानी महाबळेश्वर हीसुद्धां

५. मा. त्र्यं. पटवर्धन : फार्सी मराठी कोश ( पुणें १९२५ ) रु. ४ ( भा. इ. सं. मं. स्वीय ग्रं. २९ )

६. L. D. Swami Kannu Pillai; An Indian Ephemeris ( AD 1800 to AD 2000 ) ( Madras 1922 )








पुण्याहूनच गांठतां येई. म्हणून पुण्याचें महत्त्व "टाइम्स" च्या दृष्टीनें विशेष होतें. ह्या कामाच्या आधारावर हा "टाइम्स"चा प्रतिनिधी हि० रे० क० च्या रंगून अधिवेशनास ( स. १९२७ ) हजर राहिला. आपल्या करामतीचा पाढा त्यानें वाचला आणि मुंबई सरकार याबाबत कांहीं तरी हालचाल करीत असल्याचें आश्वासन त्यानें दिलें. पुढील अधिवेशनांतहि ( नागपूर स. १९२८ ) ह्या फ्रॅंक्सनें आपल्या कामाची बढाई मारली. त्याच्या कामागिरीचा उल्लेख खास ठरावांत आहे. यद्यपि ही कामगिरी रेसिडेन्सि रेकॉर्ड संबंधी होती. पेशव्यांच्या मोडीदप्तराबद्दल नव्हती, तरी कमिशनचें समाधान झालेलें दिसतें. परंतु खऱ्या संशोधकांचें समाधान अशा वरवरच्या देखाव्यानें किंवा "फ्रॅंक्स"च्या शोधानें व्हावें कसें ?

तें तसें झालें नव्हतें आणि कांहीं तरी भरीव योजना आंतल्या आंत शिजत असावी असें ग्वाल्हेर अधिवेशनांतल्या ( स. १९२९ ) ठरावावरून दिसून येतें. सर जदुनाथ सरकार आणि रियासतकार सरदेसाई या दोघांनीं मिळून त्या पेशवे दप्तराची पहाणी केली आणि एक 'रिपोर्टवजा' शिफारस ( सर जदुनाथांच्या सहीनें ) कमिशनपुढें विचारार्थ आली. सर जदुनाथांचें ह्या कमिशनमधलें स्थान म्हणजे "स्वयमेव सभापतित्व" लाभलेलें. संस्थापक सभासद म्हटल्यास जो मान त्यांना मिळेल तो त्यांच्या अभ्यासामुळें, व्यासंगामुळें आणि विद्वत्तेमुळें सहज प्राप्त झालेला. सरकारी सेक्रेटरी किंवा तत्सम अधिकारी "अधिकारपरत्वें" खुर्ची सांभाळून असले तरी जदुनाथांची कर्तबगारी ओळखून सर्व अधिकारसूत्रें त्यांच्या हवालीं करून ते मोकळे होत. म्हणून हि. रे. क. चा कारभार बहुंशीं सर जदुनाथांच्या तंत्रानेंच चालत असे.

अशा जदुनाथांनीं पेशवे दप्तराबद्दल रिपोर्ट हि. रे. कमिशनला सादर केला. मुंबई सरकारच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या अंतस्थ संमतीनेंहि तो तयार झाला असावा. जदुनाथांना हीं धोरणें छान साधत. मग मुंबई सरकारला तो प्रत्यक्ष हुकूमच होता, असें म्हणावें. आणि खरोखर तसेंच झालें. जदुनाथांनीं सुचविल्याप्रमाणें पेशवे-दप्तरची व्यवस्था झाली ! सरदेसायांची त्या संशोधन-निवड-कामीं नेमणूक झाली ...... आणि स. १९३० च्या पाटणा अधिवेशनांत मुंबई सरकारचे पोटभर आभार मानणारा ठराव आला —तोंडभर भाषणें झालीं ...... आणि हि. रे. क. पुरतें पेशवे दप्तर प्रकरण संपलें ! !

आतां त्याचेंच कौंसिल-प्रकरण सांगितलें पाहिजे. कारण खरी चकमक, पुणेंकरांचा सरकार-सरदेसाई या दुकलीस खरा विरोध—येथेंच व्यक्त झाला. त्यावेळच्या जखमा दीर्घ काळपर्यंत चिघळून राहिल्या—जदुनाथांना तर त्यांचा विसर मुळींच पडला नाहीं. त्यांच्या दीर्घकोपी स्वभावाला हें खाद्य प्रक्षोभक ठरलें.

मुंबई सरकारनें आपल्या १९२९-३०च्या बजेटांत रु. ११००० पेशवे दप्तरासाठीं मंजुर केल्याची खबर सरदेसायांनीं ता. ११ मे १९२९ रोजीं जदुनाथांना कळविली. आणि स्वतःस सरकारी हुकूम आल्याचें लिहिलें. काम जूनमध्यें सुरू व्हायचें होतें, त्याप्रमाणें ता. १० जून १९२९ रोजीं सरदेसाई पुण्यास कामावर रुजूं झाले. प्रथम त्यांच्याबरोबर एकच "रीडर" नेमला होता. नंतर एक महिन्यानें श्री. कृ. पां. कुलकर्णी, हे सरदेसायांना दुय्यम मदतनीस म्हणून आले. आणखी दोघे रीडर्स याच महिन्यांत नेमले. पुढील तीन महिन्यांत एक एक नवा "रीडर" नेमून घेतल्यावर एकंदर संच पुरा झाला आणि काम भराभर होऊं लागलें. पण कारकुनी अडचण आली ती अशीः—

सरकारी हुकुमांत सरदेसायांच्या नेमणुकीचा उल्लेख होता तो "पेशवे दप्तरां"तले कागद निवडण्यासंबंधीं नसून पेशव्यांच्या डायऱ्या तपासण्यासंबंधीं होता. त्यामुळें झालें काय तर ह्या "नव्यानें नेमलेल्या उपऱ्यांना" जे "रुमाल" मिळत ते फक्त "पेशवे डायरी" म्हणून "रोजकीर्दीचें कागद आहेत त्यांचे. हा संग्रह फक्त ७८० रुमालांचा असून यांतले कागद सुमारें स. १७१९ ते १८१७ या कालावधीचे आहेत. पण इतर सात विभागांत मिळून आणखी ७२०० सुमारें रुमाल आहेत, त्यांतला एकहि "उपऱ्यां" ना पहाण्यासाठीं बाहेर येईना ! पहिले चार महिने या शाब्दिक लढाईंत गेले. "हुकमाचे ताबेदार" असलेले कारकून "भारल्या" गत बोलत. सरदेसाई, कुलकर्णी ... ह्यांचें अभ्यासूजगांतले स्थान, त्यांच्या कार्याचें महत्त्व, त्यांचा हेतु, इत्यादि विचार कारकुनांना कसा असावा ? त्यांना प्रत्येक

कामांत "खो" कसा घालावा हें मात्र उत्तम कळे! दिरंगाईबहाद्दर असा किताब मिळविण्याची त्यांची सारी खटपट. सरदेसाई वरिष्ठांकडे जाऊन आपली अडचण सांगतील म्हणावें तर तो अधिकारी यांची भेट घेण्यास तयार नसे! आपल्या "शिरस्तेदारा" ला भेटण्याविषयीं त्यांचा हुकूम असल्यानें दुसऱ्या कारकुनाला भेटण्यास सरदेसाई स्वाभाविक नाखूष होते. कारण कारकुनांची जात इथून तिथून सारखीच. शिवाय सरदेसायांच्या कामांत खुसपटें काढणारे "दप्तरां"तले कारकून याच शिरस्तेदारांच्या कानमंत्रामुळें असे बिथरले होते. त्यांजकडे तक्रार करणें म्हणजे वेडेपणाच ठरला असता.

सरदेसायांच्या कामाला सुरुवात झाली तेव्हांच "माणसें" नेमण्याबद्दलच्या अटी ठरल्या. कृ. पां. कुलकर्णी यांची शिफारस सरकारनें केली. कारण दप्तरांतलें काम सर्वच "बाहेरच्यां"वर कसें सोपवावें? त्यांतल्या त्यांत सरदेसाई पडले "संस्थानी" हद्दींतले-आणि बडोदेकर सयाजीराव गायकवाडांच्या खास तैनातींतले. तेव्हां ब्रिटिश कचेरींत, त्यांच्यावर विश्वास टाकण्यास मोठी अडचण होती. पण सर जदुनाथ सरकारांनीं त्यांची शिफारस केलेली. तेव्हां त्यांच्या जोडीस एक जुना विश्वासू सरकारी अधिकारी ठेवावा, ह्या विचारानें कृ. पां. कुलकर्णी यांची नेमणूक झाली. अशा संशयी वातावरणांत प्रारंभापासून सरदेसायांना काम करावें लागलें-त्यांच्या चिकाटीबद्दल किंवा कार्यैकदृष्टीबद्दल वेगळें काय सांगावें? ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादामुळें आपल्या मदतनिसांपैकीं कांहींना नेमून घ्यावें लागळें. केवळ लायकीमुळें कोणाची नेमणूक होणें कठिण झालें. शिवाय मुख्य संपादक सरदेसाई त्यांच्या आवडी-निवडीचा विचार व्हावयास हवा होता. एका नेमणुकींत (नेमणुकीबाबतचा अर्ज नाकारण्यांत-) त्यांचें म्हणणें मान्य झालें-तें वा. सी. बेंद्रे यांचा अर्ज नाकारण्यांत-! त्यांना पेशवे दप्तराचे कामी नेमून घेतलें नाहीं!! ते नेमले असते तर पुढील वादळांतला निम्म्याहून अधिक जोर कमी झाला असता...... पण छापून खंड बाहेर काढावे कीं नाहीं याबद्दल मात्र वाद माजला असता!

ता. १३ मार्च १९३० रोजीं मुंबई कौंसिलच्या अधिवेशनांत "पेशवे दप्तर"वर भडिमार झाला. सरकारी प्रतिनिधी यांनीं प्रारंभीं सभागृहाची अनुज्ञा मागितली कीं या एका प्रश्नासंबंधीं दीर्घ-प्रदीर्घ असे ४० प्रश्न आहेत. त्यांचीं साद्यंत उत्तरें वाचून सभागृहाचा वेळ घेण्यापेक्षां "छापल्याप्रमाणें" असें म्हणावें काय? अशानें पोट प्रश्नांना योग्य वेळ मिळेल! प्रश्नोत्तरांचा हा प्रकार प्रदीर्घ तर आहेच; पण त्यांतील कुत्सित दृष्टीमुळें गर्हणीय आहे. मानवी मनाची-विशेषतः बोद्धारांची-मत्सरग्रस्तता कुठल्या गर्तेपर्यंत पोचते त्याचें उदाहरण म्हणून ही प्रश्नांची सरबत्ती छान उपयोगी पडेल. विद्वानांच्या वृत्तीचा हा नीचांक समजण्यास हरकत नाहीं[७].

सरबत्ती करणारांत सरदार गं. ना. मुजुमदार यांचें नांव प्रथम आढळतें. त्यांच्या प्रश्नांत प्राथमिक चौकशी होती. सरकारशीं शाब्दिक लढाईच खेळायची होती-पण तिघेहि लोकपक्षीय वीर इंग्रजी बेताबाताचेंच बोलणारे होते-आणि सरकारी उत्तरें "इंग्रज" देत होता. उपप्रश्न-विचारण्याचें ठाऊक असतें तरी भाषेची अडचण मुख्य असल्यानें मूळ प्रश्न इतके प्रदीर्घ पुरविले होते कीं त्यांत विचारणारांच्या वृत्तीचें प्रतिबिंब दिसावें. प्रत्येक प्रश्नांत ५-७ कलमें आहेत. सरदेसायांची नेमणूक कां केली? त्यांना संशोधनाचा अनुभव काय आहे? त्यांच्या नांवावर छापलेलीं पुस्तकें ("स्टोरी बुक्स" असें त्यांना म्हटलें आहे-तो इतिहास आहे असें म्हणण्यास नाखुषी!) सरदेसायांनीं इतरांकडून लिहून घेतलीं हें सरकारास ठाऊक आहे काय? ते बडोद्यांतले, गायकवाडींतले प्रजाजन आहेत, गायकवाड सरकार-सरकारची त्याजवर इतराजी झालेली होती-त्यांना गायकवाडांनीं बडतर्फ केलें होतें-त्यांनीं ग्वाल्हेरकरांच्या कांहीं कागदपत्रांचें संशोधन चालविलें आहे-त्याला उपयोगी असेच कागदपत्र मुद्दाम त्यांनीं निवडले कीं नाहीं? आपलीं "स्टोरी बुक्स" सजविण्यासाठीं लागणारे तेवढेच कागद त्यांनीं सरकारी खर्चानें छापून काढले नाहींत काय? असे कुणालाहि न शोभणारे, कुत्सित वृत्तीचे, पण अब्रू कुरतडण्याचे मूषक वृत्तीचे प्रश्न प्रमुख होते. सरदेसायांनीं आपले मदत-

---

७. मुंबई ले. कौं. डिबेटस् खं. २८ पृ. १३१७-२४;१४७५-५८; १५७७-९५; श्री. मुजुमदार, बोले व गुंजाळ यांनीं अनुक्रमें विचारलेले प्रश्न व उत्तरें.



अनुक्रमणिका






नीस कोणते निवडले, त्यांची जातवारी सांगावी–अमुक जातीचा "प्रतिनिधि" त्या मदतनीसांत नाहीं हें सरकारांस ठाऊक आहे काय ? अमुक पोटजातीच्या उमेदवाराला कां नाकारलें ? इत्यादि प्रश्न देखील विचारले तेव्हां सभागृहांतल्या विचारवंतांना ऐकतां-नाहि खेद झालेला दिसला. लोकशाही प्रयोगांत, मारणाराचा हात एक वेळ धरतां येईल, पण कायदेमंडळांतल्या लोकनियुक्त सभासदाचें तोंड मात्र बंद करतां येणार नाहीं.

प्रश्नांच्या ह्या सरबत्तींत कांहीं तात्त्विक प्रश्नहि होते. दप्तरांतील कागदपत्रांची जंत्री करावी, यादी करावी कां फेरिस्त करावें याबद्दल साहजिकच मतभेद होता. इतर देशांत सरकारी दप्तराची जंत्री,[८] यादी[९] किंवा फेरिस्त,[१०] कां करतात, हा वाद अप्रस्तुत होता कारण पेशवे दप्तराचा व्याप आणि मोडी लीपि यामुळें फार वेगळ्या अडचणी येत. तेव्हां प्रो. रॉलिन्सन सर जदुनाथ सरकार व आणखी सरकारी अधिकारी यांनीं व्यवहारी मध्यम मार्ग सुचविला : कागद निवडावे– प्रकरणवार, तारीखवार लावावे– (बालबोध लीपींत) छापावे, त्या कागदांचा सारांश, क्रमांक व तारीख इंग्रजींत द्यावी.

अशानें अभ्यासकांना हातीं ग्रंथ तरी मिळतील. नुसत्या यादीनें, जंत्रीनें किंवा फेरिस्तनें अभ्यासकांना कुठलेंच साहित्य हातीं मिळालें नसतें. फार तर असा असा कागद पेशवे दप्तरांत (पुण्यास) आहे एवढा शोध लागला असता. पुण्यास गेल्याखेरीज तेथील दप्तरांतून तो कागद नकलून मिळविल्याखेरीज त्याची वास्तविक उपयुक्तता ठरली नसती. म्हणून मुंबई सरकारनें मार्ग पत्करलेला व्यवहारी दृष्टीनें सोईचा व हितकर होता. याबद्दल आतांहि (३० वर्षांनंतर) तिळमात्र शंका उरत नाहीं. मग हें दप्तर संशोधकांना खुलें व्हावें या हेतूनें हि० रे० कमिशननें किंवा इतर विद्वानांनीं केलेल्या प्राथमिक सूचनांत यादी– जंत्री– फेरिस्त यापैकीं कशाचाहि उल्लेख असला तरी तो वेदवाक्य मानून त्याला चिकटून रहाण्यासारखा वेडेपणा नाहीं.

नेमका हाच तात्त्विक वाद मुंबई कौंसिलमध्यें (एतद्विषयक अज्ञांकरवीं) रंगविण्यांत सूज्ञांनीं काय साधलें कुणास ठाऊक. परकी सरकार, संशयी वृत्तीनें पहात असतां, पैशाची अडचण सांगून, पेशवे दप्तरांतले कागद सदैव बुरख्यांत दडविल्यागत ठेवूं पहात होतें. त्याऐवजीं आपणांपैकींच एक जण ते कागद निवडण्यासाठीं सरकारनें नेमला. त्याच्या मार्फत कां होईना मिळतील तेवढे कागद वाचून अभ्यासून आणखी कांहीं वर्षें हें काम चालविण्याचा तगादा सरकारला करण्याऐवजीं पुणेंकर "इद्वानांनीं काय केलें ? तर हें काम शक्य तितक्या लवकर बंद करण्यास सरकारला सवलत मिळवून दिली. ह्या फंदांत आपण कशाला पडलों, असें सरकारला होऊन गेलें. परकी सरकारविरुद्ध झगडा करतांना आपपर भावाचें भान सूज्ञांनाहि उरलें नाहीं. एवढेंच नव्हे तर मत्सरग्रस्ततेचें उत्कृष्ट प्रदर्शन देश-परदेश-भर झालें !! एका महत्कृत्याला कांहीं तरी निमित्तानें विरोध करण्याचें "श्रेय" पुणेंकरांनीं पदरांत पाडून घेतलें.

आज तीस वर्षांनीं ह्या एकंदर घटनेकडे पाहिलें म्हणजे सरकार–सरदेसाई यांच्या चिकाटीचें मनस्वी कौतुक वाटतें. पैसे नाहींत म्हणून सरकारनें हें काम बंद करायचें असें ठरवितांच जदुनाथ सरकार आणि सरदेसाई यांनीं स्वतःच्या हिंमतीवर राजेरजवाड्यांकडून या कार्यासाठीं देणगी म्हणून रु. १२००० जमविले. स्वतः सरदेसायांनीं कांहीं पैसे घ्यायचे नाहींत असें ठरवून हें काम एकदांचें तडीस नेलें. कोणत्याहि कार्याबद्दल दृढ निष्ठा असली म्हणजे इतकी विरुद्ध टीका झाली होती तरी धनिकांचा आश्रय लाभतो – तसा तो पेशवे दप्तरांतील उतारे मुद्रणयोग्य करण्यासाठीं लाभला. हें धनिकांचें औदार्य लक्षांत घेऊन मुंबई सरकारनें त्या देणगीचा

---

८. जंत्री (कॅलेंडर) म्हणजे महत्त्वाच्या मजकुराचा थोडक्यांत सारांश. (अवघड, खर्चीचें, दीर्घकालीन काम)

९. यादी (हँड लिस्ट) नांवनिशीवार त्रोटक गोषवारा. (अभ्यासूंस अपुरा)

१०. फेरिस्त (कॅटलॉग) कागदांची सूचि.












स्वीकार केला -- सरदेसायांच अंगीकृत कार्य पुरें होऊं दिलें.

कौंसिल सभासदांचे हे प्रश्न सरदेसायांच्या कामासंबंधीं असल्यानें ते कौंसिलांत प्रसिद्ध होण्यापूर्वी उत्तरें मिळविण्यासाठीं सरदेसाई व जदुनाथ सरकार यांकडे गेले असले पाहिजेत. ते वाचून उभय-विद्वानांना काय वाटलें असावें हें समजण्यासाठीं कल्पनाशक्ति विशेष ताणण्याचें कारण नाहीं. सरदेसाई थोडे वैतागले - पण जदुनाथ म्हणजे प्रशांत-सागर. त्यांनीं सरदेसायांना धीर दिला " पुण्यांतलीं सडकेवरचीं हीं कुतरडीं " उंटांच्या तांड्याकडे पाहून भुंकताहेत - भुंकोत बापडीं - असें म्हणून सरदेसायांचें समाधान त्यांनीं केलें. सरदेसायांनीं पत्करलेलें कार्य किती महत्त्वाचें आहे याची जाणीव इतक्यांत पुष्कळांना होणार नाहीं. पण तें अत्यंत महत्त्वाचें आहे. राष्ट्रीय दृष्ट्याहि त्याचें महत्त्व आहे, इत्यादि गोष्टी सांगून जदुनाथांनीं सरदेसायांस वारंवार धीर दिला आहे. म्हणून प्रत्यक्ष संपादन सरदेसायांचें असलें तरी नेमणुकीपासून-पुढील सर्व योजनेंत पावलोपावलीं पाठीराखेपणा पत्करून जदुनाथांनीं हें कार्य सरदेसायांकडून करविलें-असें म्हणण्यांत कुणाचाहि अधिक्षेप करण्याचा हेतु नाहीं. पेशवे दप्तरांतील प्रसिद्ध कागदांचा अभ्यास जदुनाथांनीं किती बारकाईनें केला होता त्याची कुणास माहितीच नाहीं. मराठी ( बालबोध ) ते इतक्या सराइतप्रमाणें वाचतात हेंच मुळीं पुष्कळांस खरें वाटत नसे. पण पेशवे दप्तरांतील कागदांच्या ४५ खंडांची पुनरावृत्ति छापण्याचा विचार सुरू झाला; तेव्हां सरदेसाई मुद्रण प्रत तयार करीत असतां सर्वांत अधिक दुरुस्त्या, सूचना, सर जदुनाथांकडून आल्या-आणि त्या अत्यंत व्यवस्थित होत्या. यांखेरीज वेळोवेळीं खंड प्रकाशित होत गेले तसतशा दुरुस्त्या त्यांनीं सुचविल्या होत्या त्या निराळ्या !

ह्या सर्व सवाल-जबाबांत भारत इतिहास-संशोधन मंडळाचें नांव निष्कारण गोवलें-आणि तें प्रथम प्रथम मंडळास भोवलें. आणि काळानें उगवलेला सूड म्हणतात तोहि मंडळाच्या वाट्यास आला ! सरदेसाई संपादित खंडांपैकीं जेवढे उरले तेवढे सरकारी छापखान्याकडून घेऊन मंडळ त्यांची विक्री करीत आहे. आतां सरकारी छापखान्यांत ते विकत मिळत नाहींत-तर मंडळाकडे मिळतात. मंडळाचा प्रतिनिधि संपादकीय कार्यांत घेतला नाहीं; खुद्द सरदेसाई यांची नेमणूक करतांना मंडळाला विचारलें देखील नाहीं. मंडळाकडे ह्या कार्यांत शिकून तरबेज झालेली मंडळी पुष्कळ आहेत. त्यांचा उपयोग सरकार कां करीत नाहीं. संपादन कसें करावें, जंत्री चांगली कीं यादी बरी, इत्यादि वादांत मंडळाचा सल्ला कां घेतला नाहीं. इत्यादि प्रश्नांचा भडिमार सरकारवर करवितांना पुष्कळ अप्रिय गोष्टीहि ऐकाव्या लागल्या-किंवा पर्यायानें उत्तरांत आल्या. दुसऱ्याच्या आंगावर शिंतोडे उडावे म्हणून चिखलांत धोंडा टाकणारा सहीसलामत सुटत नाहीं, त्याच्याहि वाटणीस कांहीं शिंतोडे येतात-तसें मंडळाचें झालें. मंडळासारख्या अव्वल दर्जाच्या संशोधक मंडळावर असें व्हायला नको होतें. पण त्या संस्थेचे हितचिंतकच अहितकर्ते ठरले ! !

मंडळासंबंधीं माहिती विचारतांना एकदां सरकारास विचारलें कीं, " प्रो. रॉलिन्सन आणि गो. स. सरदेसाई हे मंडळाविरुद्ध प्रचार सरकार दरबारी करतात कीं नाहीं ? " वास्तविक असा प्रचार कुणी करणार नाहीं. आणि करीत असल्यास त्याबद्दल चावडीवर जाऊन ओरड करण्यासारखा मूर्खपणा नाहीं. " मंडळाला पेशवे दप्तराबाबत कां विचारलें नाहीं ? " या प्रश्नाला हुशार अधिकारी कुणीहि असला तरी एकच उत्तर सुजनतेनें देईल : " विचारावेंसें वाटलें नाहीं ! " मंडळाच्या कामगिरीबद्दल अनेक पाश्चिमात्य पंडितांनींहि प्रशंसा केली आहे हें सरकारास ठाऊक आहे काय ? असाहि एक प्रश्न होता. त्याला कुठल्याहि सरकारनें उत्तर " नाहीं " असेंच मुद्दाम दिलें असतें. पण ह्या सर्व प्रश्नोत्तरांत सरकारचें " अज्ञान " व्यक्त झालें तरी संस्थेचा दर्जा खालावतो- संस्थेबद्दल निष्कारण दुराग्रह वाढतात- एवढेंहि भान त्या हितचिंतकांस राहिलें नाहीं !

भारत इतिहास संशोधक मंडळाची सल्ला-मसलत सरकारनें तरी कां घेतली नाहीं ? असाहि एक प्रश्न निघतो. त्याचें उत्तर स्पष्ट आणि सोपें आहे. त्यावेळीं मंडळाचें मत सरदेसाई आणि जदुनाथ सरकार या उभयतांसहि अनुकूल नव्हतें. सरदेसाई हे नुसते " संक-



अनुक्रमणिका






लनकार " आहेत; संशोधन त्यांनीं केलें नाहीं-तें त्यांना जमायचें नाहीं.-साधायचें नाहीं-ही मंडळांतल्या जाणत्यांची ठाम भूमिका. सर जदुनाथांना तर मोडी येत नाहीं. तेव्हां त्यांचें मत या कामीं घेऊं नये, ग्राह्य तर मुळींच धरूं नये. हा मंडळाचा दुसरा आग्रह. तिसरा आग्रह यादी-जंत्री करण्याबाबत. सरदेसाई कोण मोठे आले ग्राह्याग्राह्य ठरविणारे ? आम्हांस एकूण एक चिठोरा महत्त्वाचा वाटतो. ही भूमिका मंडळाची. हीं मतें तत्त्वनिष्ठ असोत, रास्त असोत, किंवा कशींहि असोत, तीं व्यवहारचतुर इंग्रजाला पटावीं कशीं ? ज्याला जगभर इतिहासाचार्य म्हणून मान आहे, ज्याला " सर " की बहाल झाली, इंग्रज आय्. सी. एस्. इतिहासकार्याचें पुस्तक ज्यानें पुरें केलें, कलकत्ता विद्यापीठाचा जो उपकुलगुरु राहिला होता. त्या जदुनाथांच्या सह्ययाबद्दल, त्यांच्या सद्धेतूंबद्दल जाहीर शंका कुणीहि घेतली तरी शंका घेणाराबद्दलच इंग्रज साशंक होईल. निदान एवढें तरी इंग्रजानें खास ओळखलें असतें कीं सर जदुनाथांसारखा विद्वान भलत्या शहाणपणाचा नसता आव आणणार नाहीं; आपणांस ठाऊक नाहीं त्याबाबतींत इतक्या ठामपणें तो बोलणार नाहीं. हाच नेमका विचार आमच्या विद्वानांना रहात नाहीं.

यादी, जंत्री, फेरिस्त, या वादाचा निकाल जगाच्या अंतापर्यंत लागणार नाहीं. तिन्हीहि प्रकार केले तरी चालतील. पण पैसा, साधनें आणि काळ यांचा विचार करून व्यवहारी मार्ग पत्करला. निवडून आले तसतसे कागद प्रकरणवार छापून काढले. यांत काय बिघडलें ? पण नुसता तात्त्विक वाद तंडत रहाणीराचें समाधान कसें व्हावें ? वास्तविक मंडळाजवळहि अनेक रुमाल (पोतीं !) कागद आहेत — त्यांची जंत्री, फेरिस्त, यादी किंवा निवडक कागदाची छपाई मंडळानें केली आहे का ? पैशाची अडचण सर्वकाळ आहे. पण व्यवहारी मार्ग पत्करला असता-- सर्वसंग्रही वृत्ति धरली असती तर पेशवेदप्तराचे खंड निघाले तसे मंडळाच्या दप्तरांतलेहि अनेक खंड निघाले असते — सरकार-सरदेसाई या दोघांनीं त्या बाबतींत भरपूर सक्रिय मदत दिली असती ... पण तें व्हायचें नव्हतें ... असो.

पेशवे दप्तर अभ्यासकांना " खुलें " असावें असा ठराव हिस्टा० रे० कमिशनचा होत होता आणि " सरकारमान्य " अशा अभ्यासकांना त्यांत प्रवेश मिळतहि होता - हें फ्रँक्स सारख्याच्या उदाहरणावरून दिसतें. पण प्रो. दत्तो वामन पोतदार यांस पेशवेदप्तर पहाण्याची परवानगी नाकारली असल्याची माहिती कौंसिलच्या प्रश्नोत्तरींत[11] उघड झाली तशी हिस्टॉ० रे० कमिशनच्या वार्षिक[12] रिपोर्टांतहि झाली. त्यांनीं " सर्व रेकॉर्ड तपासण्यासाठीं परवानगी मागितली असावी असें दिसतें. (= जनरल परमिशन् टु सी ऑल दप्तर) त्या वेळच्या इंग्रजांची साशंकवृत्ति लक्षांत घेतां परवानगी मागतांना कुठल्या तरी विशिष्ट "प्रश्ना" पुरती-विषया पुरती— मागणें व्यवहारी ठरलें असतें असें आजहि वाटतें, एकदां आंत प्रवेश मिळाल्यावर मग फारशी अडचण नसते.[13] प्रो. पोतदारांनीं अशी व्यापक " सर्वग्राही पण अनिश्चित " परवानगी मागायास नको होती-निरनिराळ्या विषयासाठीं-प्रसंगोपात्त परवानगी मागणें आवश्यक होतें. सरकारी कचेरींतील रीतरिवाज समजून घेऊन चालणें सर्वांनाच हितावह

---

११. मुं. कौं. रिपोर्ट खं. २८ पृ. १५९२ (ता. १९-३-३०).

१२. हिं० रे० कमिशन खं. ८ पृ. २३८ (नोव्हें. १९२५).

१३. याबाबत माझे अनुभव दोन दप्तरखान्याबाबतचे सांगण्यासारखे आहेत. अफगाणिस्तानाहून परत येतांना (स. १९३३) लाहोर मधील (अनारकली) रेकॉर्ड ऑफिसमध्यें अफगाण मोहिमासंबंधीचे कागदपत्र पहाण्याची अनुज्ञा मागितली आणि लेखी अर्ज करण्याचीहि गरज न पडतां मला तेथें (पोलिसी पहाऱ्यांतून) जाण्याची परवानगी सहज मिळाली — तीन चार दिवस तेथें जाऊन मी बसत होतों — पुष्कळ टिपणें केलीं — कांहीं कागदांच्या नकलाहि केल्या. माझा " विषय " ध्यानांत घेऊन बरेंचसें " गुप्त " रेकॉर्ड सायफर कोडी तारांचें माझ्यासाठीं म्हणून उपलब्ध करून दिलें !! दुसरा मुंबईच्या रेकॉर्ड ऑफिसमधला आहे (स. १९३८-३९) " लोकहितवादी " च्या काळची माहिती जमविण्यासाठीं जुनें रेकॉर्ड पहावयाची अनुज्ञा मी मागितली. ती रीतसर मिळाली. माझ्या अभ्यासाव्यतिरिक्त इतरहि पुष्कळ फायली-पुस्तकें-चाळतां आलीं.



अनुक्रमणिका






ठरतें. तेथील कामकाजाबाबत नसता अट्टाग्रह चालविणें इष्ट नव्हे.

पूना रेसिडेन्सी कॉरस्पॉन्डन्स" (मराठी इतिहासाचें इंग्रजी साहित्य) या पत्रव्यवहाराचे १४–१५ खंड प्रसिद्ध झाले. त्या प्रत्येक खंडाच्या प्रारंभीं 'ऋणनिर्देश' प्रमुखपणें केला आहे तो असा–

सर जदुनाथ सरकार आणि गो. स. सरदेसाई या उभयतांनीं हे खंड संपादण्याचें पत्करलें. ह्या कामाबद्दल कसलाहि मेहेनताना त्यांनीं घेतला नाहीं. वेळोवेळीं त्यांना प्रवास करावा लागला–तो खर्चहि त्यांचा त्यांनींच सोसला.

शिवाजी मेमोरियल कमिटीनें रु. ३९०० देऊन या खंडांची टंक लिखितें करण्याची सोय केली म्हणून संपादन-मुद्रण सोपें झालें.

या बाबतचें हें ऋण मुंबई सरकार नोंदून ठेवीत आहे.

पेशवे दप्तरांतलें कार्य सरदेसाई आणि जदुनाथ यांनीं पार पाडलें असें म्हणतांना एका कष्टाळू कार्यकर्त्याचें विस्मरण होतें. कारण इतर सर्व कार्यकर्त्यांना रजा दिल्यावरहि श्री. वि. ग. दिघे यांची कामगिरी चालू होती. ह्याच वेळीं त्यांनीं सरजदुनाथांच्या देखरेखीखाली "बाजीराव पेशवे (पहिले)" हा प्रबंध लिहून मुंबई युनिव्हर्सिटीची डॉक्टोरेट मिळविली आणि सरकारी दप्तरदार असा हुद्दाहि त्यांना मिळाला. त्यांनीं पेशवे दप्तर व रेसिडेन्सी रेकॉर्डस् यांबाबत केलें तेवढें काम करण्याची संधि इतर कुणाल्याहि मिळाली नाहीं. सरदेसाई काय किंवा जदुनाथ काय, प्रत्यक्ष कचेरींत दोघेहि जात-येत नसत. त्यामुळें सर्व कामाचा बोजा दिघे यांजवरच पडला. सरदेसायांचें वार्धक्य, मधून मधून आजारपण, यामुळें त्यांचें पुष्कळसें प्राथमिक काम कचेरींतूनच करावें लागे आणि कचेरींत होते दिघे. सूचींचें, कागदपत्र तपासण्याचें, मुद्रितें पहाण्याचें, ......असें बरेंचसें कार्य संपादकांसाठीं तयार करून पुरवावें लागे. एका (४ थ्या) इंग्रजी पत्रव्यवहाराचा खंड स्वतः दिघे यांनीं संपादिला. परंतु या सर्व खंडांचे अज्ञात 'संपादक' म्हणून दिघे यांस मान देणें आवश्यक आहे. अशा कष्टाळू व पक्क्या माहितगार अभ्यासकाचें चीज मुंबईस झालें नाहीं हें आश्चर्य! डेक्कन कॉलेजमधील नेमणुकीच्या वेळीं कांहीं तांत्रिक अडचणी आड आल्या; त्यांना पगारमानहि व्यवस्थित मिळालें नाहीं; हा लालफितीचा ठोकळेबाज पराक्रम म्हणावा– दुसरें काय? परंतु जाणत्यांना पक्कें ठाऊक आहे कीं सरकार– सरदेसाई यांच्या अतःपरच्या सर्व संपादन कार्यात– मग तें पेशवे दप्तरचें असो– ग्वाल्हेर दरबारचें असो किंवा इतर कुठलें असो– दिघे मेहनतीचे धनी होते. पेशवे दप्तरची पगारी मंडळी मोकळी झाल्यावर दिघे एकटेच त्या जबाबदारीचे मालक ठरले. सरदेसाई– जदुनाथ यांनीं दिघे यांस किती विविध कामें सांगितलीं– आणि दिघे यांनीं तीं बिनबोभाट पार पाडलीं– म्हणून तर त्यांजवर हा सर्व बोजा सारखा वाढत गेला नाहीं ना? असाहि संशय येतो. सरदेसायांनीं आपल्या इंग्रजी इतिहासाच्या प्रथमखंडांत दिघे यांच्या सतरा सालांच्या सतत सहकार्याचा मुद्दाम उल्लेख केला आहे (१९२९-४६). डॉ. दिघे यांचा त्याग मोठा होय– त्यांचें ऋण जाणत्यांनीं तरी मानलें पाहिजे.

श्री. भा. कृ. देसाई

# इराणमधील राजकीय परिवर्तनाची समस्या

## परिवर्तनाची पार्श्वभूमि

गेल्या वर्षी उन्हाळयांत इराणमध्यें मध्यवर्ती कायदे-मंडळाच्या – मजलिसच्या सार्वत्रिक निवडणुका झाल्या. या निवडणुकांत भ्रष्टाचाराला मुळींच वाव मिळणार नाहीं, व त्या निवडणुका इराणच्या इतिहासांतील आदर्श निवडणुका ठरतील, असें आश्वासन निवडणुकांपूर्वी शहानें जनतेला दिलें होतें. पण प्रत्यक्षांत या निवडणुका म्हणजे नेहमीप्रमाणेंच मतदानाचा एक अजब फार्सच ठरला. अधिकारारूढ पक्षानें या निवडणुकांत सत्तेचा सर्रास दुरुपयोग केला व पूर्वीपेक्षांहि अधिक मतांनीं व संख्येनें तो निवडून आला. अर्थात् इराणमधील मध्ययुगीन सरंजामशाही राजकारणांत हा चमत्कार कांहीं नवा नव्हता. खेड्यांतील अशिक्षित शेतकऱ्यांनीं दडपशाहीच्या भीतीनें अधिकारारूढ पक्षाला या निवडणुकांत मतें दिलीं, यांत आश्चर्य नव्हतें. पण तेहरानसारख्या सुशिक्षित मध्यमवर्गीयांचा भरणा असलेल्या २० लाख लोकसंख्येच्या राजधानींतहि अधिकारारूढ पक्षानें सर्व जागा काबीज करण्याचा चमत्कार करून दाखवावा, हें कौटिल्य सहजासहजीं पटणारें नव्हतें. परिणामीं अधिकारारूढ पक्षाच्या भ्रष्टाचाराचा देशभर गवगवा झाला व प्रचलित राजवटीविरोधी आजवर सुप्त असलेला जनतेतील असंतोष उफाळून वर आला व संघटित रीतीनें व्यक्त होऊं लागला.

या विरोधाचा परिणाम म्हणजे शहानें अखेरीस त्या निवडणुकाच रद्द ठरवल्या व देशांत पुन्हां नव्यानें निवडणुका घेण्याचा बेत जाहीर केला. मध्यंतरीच्या काळासाठीं त्यानें सनदी अधिकाऱ्यांचें तात्पुरतें काळजीवाहू मंत्रिमंडळ नेमलें. त्याचबरोबर निवडणुकांतील भ्रष्टाचारांना आळा घालण्यासाठीं निवडणुक-कायद्यांत योग्य ते बदल सुचविण्यासाठीं देशांतील कायदेपंडितांची त्यानें एक समिति नेमली, व या फेरनिवडणुकांत भ्रष्टाचारांना मुळींच थारा देण्यांत येणार नाहीं म्हणून त्यानें पुन्हां एकवार जनतेला आश्वासन दिलें.

या फेरनिवडणुका यावर्षी १० जानेवारी ते ६ फेब्रुवारीपर्यंत पार पडल्या. देशांत इतरत्र मतदान शांतपणें पार पडलें, पण तेहरानमध्यें मात्र निवडणुकीच्या निमित्तानें शहाच्या राजवटीला असलेला विरोध पुन्हां उफाळून वर आला. तेहरानमध्यें शेवटच्या दिवशीं, म्हणजे ६ फेब्रुवारीला, मतदान झालें. पण जानेवारीच्या मध्यापासूनच राजधानींत मोर्चा-निदर्शनांना ऊत आला होता. या निदर्शनांत तेहरानमधील विद्यार्थ्यांनी पुढाकार घेतला होता. दररोज अक्षरशः हजारों विद्यार्थी जाहीर मोर्चे काढून देशांतील नागरीक स्वातंत्र्याचा अभाव व सदोष निवडणूक-पद्धति या विरुद्ध आपला निषेध व्यक्त करीत होते. इराणच्या राजकीय इतिहासांत हीं निदर्शनें प्रथमच घडून येत होतीं; पण या दैनंदिन निदर्शनांना आळा घालण्यासाठीं सरकारनें दडपशाहीचा अवलंब केला नाहीं आणि या निदर्शनांचेंहि सार्वत्रिक हुल्लडबाजींत रूपांतर झालें नाहीं. या दोनहि घटना इराणच्या इतिहासांत अपूर्व होत्या; आणि त्या इराणच्या राजकारणांतील बदलत्या वातावरणाच्या द्योतक होत्या. एक वर्षापूर्वी या घटना इराणमध्यें केवळ असंभवनीय गणल्या गेल्या असत्या. आणि आज त्या घडूनहि इराणच्या राजकारणांत क्रांतिकारक उलथापालथ घडून येण्याचीं चिन्हें दिसत नाहींत.

## राजप्रमुख आणि राज्यांतील परिस्थिति

आज इराणमधील परिस्थिति स्फोटक नसली तरी प्रचलित राज्यव्यवस्थेबद्दल व समाजव्यवस्थेबद्दल देशांत असंतोष धुमसत आहे, या वस्तुस्थितीकडे शहाला दुर्लक्ष करणें शक्य नाहीं. या असंतोषाचें कारण इराणमधील मध्ययुगीन समाजव्यवस्था व त्यावर आधारलेली सरंजामशाही राज्यव्यवस्था हें आहे. ही जुनाट समाजव्यवस्था आज मोडकळीला आली असली तरी अजूनहि ती सामाजिक व राजकीय सुधारणांना अटकाव करण्यास समर्थ आहे. सरदार-जमीनदारांच्या प्रतिष्ठेला व सत्तेला आज तडे गेले असले तरी हा वर्ग सत्तारूढ असल्यामुळें इराणच्या राजकीय व आर्थिक प्रगतीला त्याचा अडथळा होत आहे. पण त्याचबरोबर आधुनिक शिक्षण व तांत्रिक सुधारणा यांच्यायोगें आज देशांत सुशिक्षित मध्यमवर्ग उदयास आला आहे. आणि

या मध्यमवर्गीयांच्या आशा-आकांक्षांना देशांतील मध्ययुगीन परिस्थितीमुळें फलद्रूप होण्यास वाव मिळणें कठीण झालें आहे. तेहरान विद्यापीठांत आज १२ हजार विद्यार्थी मोफत उच्च शिक्षण घेत आहेत; आणि सुमारे २० हजार इराणी विद्यार्थी युरोप-अमेरिकेंतील विद्यापीठांत शिक्षण घेत आहेत. साहजिकच आधुनिक शिक्षणानें प्रभावित झालेल्या व लोकशाहीच्या मूल्यांनीं प्रेरित झालेल्या या विद्यार्थीवर्गानें प्रचलित राजवटीला विरोध करण्यांत पुढाकार घ्यावा व चालू असंतोषाला वाचा फोडावी, हें साहाजिकच आहे. फेब्रुवारींत विद्यार्थ्यांनी तेहरानमध्यें संप-निदर्शनांत पुढाकार घेतला त्यामुळें तेहरान विद्यापीठ बेमुदत बंद करण्यांत आलें आहे. शाहाच्या सल्लागारांना अर्थातच विद्यार्थ्यांचें हें वर्तन पसंत नाहीं व असंतोष व्यक्त करण्यास त्यांना मुभा दिली तर ते अनावर होतील अशी त्यांना धास्ती वाटत आहे. म्हणून विद्यार्थ्यांना राजकारणांत भाग घेण्यास मनाई करावी असा शहाच्या अधिकाऱ्यांनीं शहाला सल्ला दिला आहे. पण सुदैवानें विद्यार्थ्यांच्या आशा-आकांक्षांबद्दल शहाला सहानुभूति आहे. देशाच्या प्रगतीसाठीं आर्थिक व सामाजिक सुधारणा घडवून आणणें आवश्यक आहे, हें शहाला मान्य आहे. मात्र राजकीय सुधारणा सावधपणें व आस्तेआस्ते घडवून आणाव्यात असा त्याचा आग्रह आहे. लोकशाहीच्या स्थापनेसाठीं इराणमध्यें प्रथम अनुकूल परिस्थिति निर्माण करणें हें आज महत्त्वाचें आहे. देशांतील २ कोटी लोकसंख्येपैकीं ८८ टक्के जनता निरक्षर आहे. यांत भर म्हणजे अत्यंत मागासलेलीं दळणवळणांचीं साधनें व समाजाची घडी वारंवार विस्कटणाऱ्या भाषिक व वांशिक अल्पसंख्य जमातींचें अस्तित्व आणि मागासलेल्या टोळ्यांच्या परस्परविरोधी निष्ठा यामुळें इराणमधील समाज केवळ मागासलेला आहे एवढेंच नव्हे, तर त्यांत एकजिनसीपणाचाहि अभाव आहे. आणि राज्यकारभार कार्यक्षमरीतीनें चालवण्यास आवश्यक असलेली सनदी नोकरशाहीदेखील अजून देशांत अस्तित्वांत आलेली नाहीं. या साऱ्या वस्तुस्थितीमुळें राजकीय व सामाजिक सुधारणा अंमलांत आणतांना शहाला जपून काळजीपूर्वक पावलें टाकावीं लागत आहेत. गेल्या निवडणुकींतील भ्रष्टाचाराला ही एकंदर परिस्थितीच पुष्कळशी जबाबदार आहे. पण राज्यप्रमुख असल्यामुळें साहजिकच या सर्व दोषांचें खापर आज शहावर फोडण्यांत येत आहे.

## मध्यपूर्वेंतील देश आणि इराण

बदलत्या काळानुसार प्रस्थापित समाजरचनेंत व राज्यव्यवस्थेंत कसें परिवर्तन घडवून आणावें ही अशा रीतीनें आज इराणपुढील सर्वांत महत्त्वाची समस्या आहे. एका अर्थानें, मध्यपूर्वेंतील सर्वच देशांपुढें आज ही समस्या उभी आहे. इराक, ईजिप्त वगैरे देशांत लष्करी राज्यक्रान्तीच्या साह्यानें हें परिवर्तन घडवून आणण्याचा प्रयत्न झाला. त्या देशांतील लष्करी अधिकाऱ्यांनीं या क्रान्तीचें नेतृत्व स्वीकारलें व मोडकळीला आलेली प्रचलित राज्य व समाज व्यवस्था त्यांनीं लष्करी सत्तेच्या साह्यानें उलथून टाकली. पण इराणमध्यें इतर वरिष्ठ अधिकारारूढ वर्गाप्रमाणेंच लष्करालाहि खास अधिकार previleges बहाल करण्यांत आले आहेत. म्हणजे एका अर्थानें लष्करी अधिकारी वर्गहि वरिष्ठ मिरासदार वर्गाचाच एक घटक आहे. त्यामुळें साहजिकच या वर्गांत सामाजिक वा राजकीय क्रान्तीची अगर परिवर्तनाची ईर्षा आढळत नाहीं. म्हणजे संघटित व प्रबळ अशा विरोधी वर्गाच्या अभावीं आज इराणमध्यें राज्यक्रान्तीची शक्यता कमी आहे. आणि त्याचमुळें हें परिवर्तन घडवून आणण्याची जबाबदारी आज शहावरच येऊन पडलेली आहे.

## लोकशाहीची वाटचाल

प्रचलित परिस्थितीची कोंडी फोडण्यासाठीं शहानें आज उदार राजकीय धोरण स्वीकारलें आहे. उदाहरणार्थ आज इराणमध्यें मोसद्दिकच्या अनुयायांवरील राजकीय बंदी उठवण्यांत आली आहे. या अनुयायांनी आतां नॅशनल फ्रंट या संघटनेमार्फत आपलें कार्य सुरू केलें आहे. नॅशनल फ्रंट ही समाजवादी व तटस्थतेचा पुरस्कार करणारी संघटना आहे. पण तिला विशेषसा लोकांचा पाठिंबा नाहीं. मात्र गेल्या निवडणुकांत तिला एक दोन ठिकाणीं शेकडा ऐंशी टक्के मतें पडलीं हें लक्ष्यांत ठेवणें जरूर आहे. विरोधकांना प्रचाराला वाव देण्याच्या शहाच्या धोरणाचें दुसरें उदाहरण म्हणजे मोझफ्फर बघाई या विरोधी पक्षाच्या प्रभावी पुढाऱ्याची निवडणुकपूर्वी शहानें केलेली सुटका. बघाई हा कामगार पक्षाचा नेता आहे. व तो पूर्वी मोसद्दिकचा सह-

कारी होता. पण नंतर मोसद्दिकचे आणि त्याचे मतभेद झाले. त्याच्या खंबीर व प्रभावी विरोधामुळें त्याला आजवर अनेकवेळां कारावासाची व हद्दपारीची शिक्षा भोगावी लागली आहे. गेल्या वर्षी १५ सप्टेंबर रोजीं त्याला पुन्हां अटक करण्यांत आली होती; व राष्ट्रहितविरोधी चळवळीच्या आरोपावरून लष्करी न्यायालयानें त्याला सजाहि दिली होती. पण शहानें ऑक्टोबरमध्येंच त्याची सुटका केली. आणि निवडणुकीच्या काळांत बघाईनें शहाविरोधी प्रभावी प्रचारमोहीमहि उघडली होती.

या सगळया प्रचार-स्वातंत्र्यामुळें यावेळीं निवडणूक मोहीम धामधुमीची झाली. या स्वातंत्र्याचा परिणाम सार्वत्रिक दंगलींत होईल अशी भीतीहि कांहीं काळ अधिकाऱ्यांना पडली होती. या भीतीमुळेंच तेहरान विद्यापीठांतील विद्यार्थ्यांनी दंगल केल्याबरोबर तें विद्यापीठ बेमुदत बंद केलें गेलें. त्याचप्रमाणें बघाईलाहि पुन्हां अटक करण्यांत आली आणि कांही संशयित कम्युनिस्टांनाहि पकडण्यांत आलें. निवडणुकीच्या अखेरच्या दिवसांत कांहीं ठिकाणीं दंगलीहि घडून आल्या व कांहीं ठिकाणीं निदर्शकांना पांगवण्यासाठीं पोलीसांनीं बळाचाहि वापर केला. पण हें सारें घडूनहि सर्वसामान्यतः निवडणूक शांततामय रीतीनेंच पार पडली.

या निवडणुकींत अधिकारारूढ (मेल्युन) पक्षालाच सर्वांत जास्त जागा मिळाल्या. त्याच्या खालोखाल मार्डम या राजनिष्ठ विरोधी पक्षाला जागा मिळाल्या. स्वतंत्र उमेदवारांचा तिसरा नंबर लागला. तेहरानमध्यें मात्र स्वतंत्र उमेदवारांना सर्वांत जास्त जागा मिळाल्या. या निवडणुकीच्या निकालावरून येतीं चार वर्षे इराणमध्यें संमिश्र मंत्रिमंडळ अधिकारावर येईल असा संभव दिसतो. या नव्या सरकारला निवडणुकीच्या काळांत निर्माण झालेलें तंग राजकीय वातावरण निवळण्यासाठीं प्रथम प्रयत्न करावा लागेल. त्याचप्रमाणें इराणची आर्थिक परिस्थिति सुधारण्याचें कामहि या सरकारला निकडीनें हातीं घ्यावें लागेल. इराण सरकारला तेलाच्या उत्पादनापासून सालीना १३० कोटी रुपयांचें उत्पन्न होत असलें तरी आज इराण आर्थिक दिवाळखोरीच्या कांठावर उभा आहे. इराकमधील १९५८ च्या क्रान्तीनंतर इराण सरकारनें संरक्षण व पोलीस या खात्यावरील खर्च बेसुमार वाढवला व त्याचप्रमाणें निरनिराळ्या विकास योजनांवरीलहि खर्च दुपटीनें वाढवला. याचा परिणाम परकीय चलनाची आज इराणला बेसुमार तूट आली आहे, आणि गेल्या तीन वर्षांत सर्वसामान्य वस्तूंच्या किंमती ३० टक्क्यांनीं वाढल्या आहेत. या चलनवाढीमुळें निर्माण झालेला असंतोष कमी करणें हें नव्या सरकारचें प्रमुख उद्दिष्ट राहील. तसेंच राज्यकारभारांतील भ्रष्टाचार व उधळपट्टी यांना आळा घालून नव्या प्रगतिकारक योजनाहि नव्या सरकारला अंमलांत आणाव्या लागतील.

## राज्यप्रमुख व राजकीय पक्ष यांचें धोरण

अर्थात् या राज्यकारभाराची अंतिम जबाबदारी शहावरच आहे. इराणमधील राजेशाही ही जगांतील सर्वात जुनी– अडीच हजार वर्षे सतत अधिकारारुढ असलेली राजेशाही आहे. आणि अजूनहि इराणमधील बहुसंख्य लोक राजनिष्ठ आहेत. पण आजच्या काळांत आर्थिक व राजकीय प्रगति केल्याखेरीज ही राजेशाही फार काळ टिकूं शकणार नाहीं. शहाच्या सुधारणानुकूल दृष्टिकोनामुळें इराणमध्यें शांततामय परिवर्तन घडून येण्यास वाव आहे. राज्यकारभारांत देशांतील पुरोगामी राजकीय पक्ष-प्रवृत्तींचें सहकार्य घ्यावें या हेतूनें कांहीं दिवसांपूर्वी शहानें नॅशनल फ्रंट या मोसद्दिकवादी डाव्या संघटनेला सर्वपक्षीय राष्ट्रीय सरकारांत प्रतिनिधित्व देण्याची तयारी दर्शवली होती. मात्र नॅशनलफ्रंटच्या पुढाऱ्यांनीं फक्त आपण राजनिष्ठ, घटनानिष्ठ व कम्युनिस्टविरोधी आहोंत एव्हढें निःसंदिग्धपणें जाहीर करावें अशी अट शहानें घातली होती. पण नॅशनलफ्रंटच्या पुढाऱ्यांनीं ही अट धुडकावून लावली व उलट शहानेंच नामधारी घटनात्मक राज्यप्रमुख व्हावें अशी मागणी केली. यावर शहानें "तुम्ही स्वीडिश जनतेप्रमाणें ज्यादिवशीं जबाबदार लोकशाहीवादी नागरीक व्हाल, त्यादिवशीं मीदेखील स्वीडनच्या राजाप्रमाणें नामधारी घटनात्मक राज्यप्रमुख व्हायला संमति देईन" असें या पुढाऱ्यांना उत्तर दिलें. आज इराणमध्यें तत्काळ लोकशाही स्थापन करणें शक्य नाहीं. व तसा प्रयत्न यशस्वीहि होणार नाहीं, या शहाच्या दाव्यांत पुष्कळच तथ्य आहे. खुद्द इराणमधील सोशलिस्ट लीगसारख्या पुरोगामी संघटनांनाहि "इराणमध्यें आज लोकशाहीची स्थापना करणें म्हणजे अराज-

काला आवाहन देणें आहे " असें वाटत आहे. आज इराणची निकडीची गरज " प्रचलित मध्ययुगीन परिस्थितींत बदल घडवून आणण्यासाठी सामाजिक व राजकीय सुधारणांचा प्रागतिक कार्यक्रम अंमलांत आणणें " हें या सोशलिस्ट लीगचें मत या संदर्भात लक्षांत घेणें जरुर आहे. शहाची विचारसरणीहि याच प्रकारची असल्यामुळें इराणमधील पुरोगामी राजकीय गट व शहा यांनीं एकत्र येऊन परस्पर सहकार्य केलें तर येत्या आठ–दहा वर्षांमध्यें इराणमध्यें लोकशाही संस्थांचा पाया घालणें शक्य होईल. [आधारित]

---

## वाचकांचा पत्रव्यवहार –

संपादक, 'नवभारत'

सप्रेम नमस्कार वि. वि.

'नवभारत' मासिकाच्या फेब्रुवारी ६१ च्या अंकांतील प्रा. सुमंत मुरंजन यांच्या 'मानवाचें भवितव्य' या (प्रा. मेडावर यांच्या भाषणावर आधारलेल्या) लेखांत पुढील एक वाक्य आढळतें– "गर्भवासाची परिस्थिति जर अधिक अनुकूल झाली तर गर्भास पुल्लिंगी कलाटणी नाहींतर स्त्रीलिंगी कलाटणी मिळणें शक्य दिसतें." हें विधान वाचून वाचकांची अशी कल्पना होणें साहजिक आहे कीं अपत्याचें लिंग गर्भाशयांतील परिस्थितीवरून ठरणें शक्य आहे. लिंगनिर्णयाविषयीं जननशास्त्रानें अलीकडे जे शोध लावले आहेत, त्या शोधाशीं हें विधान पूर्णपणें विसंगत आहे. पण असें विधान करावयास कांहींच कारण नाहीं असें नाहीं. याविषयीं खरी परिस्थिति काय आहे हें स्पष्ट करणें अगत्याचें आहे असें वाटल्यावरून हें पत्र लिहीत आहे. त्याला आपण प्रसिद्धि द्याल अशी आशा आहे.

मेंडेलच्या युगप्रवर्तक शोधापूर्वीं कित्येक मान्यवर शास्त्रज्ञसुद्धा लिंग बाहेरील परिस्थितीवरून ठरत असावें असें मानत होते. आनुवंशिक गुणांचें सातत्य कोणत्या यंत्रणेमुळें टिकविलें जातें याचें कांहींच ज्ञान त्याना नसल्यामुळें त्यांची ही समजूत स्वाभाविक होती. मेंडेलच्या शोधानंतर ही परिस्थिति पालटली. आनुवंशिक गुणांचें सातत्य टिकविणारी यंत्रणा पेशीच्या केंद्रांतील विशिष्ट भौतिक घटकावर आधारलेली आहे, इतकेंच नव्हे तर ती यंत्रणा फारच सोपी आहे असें आढळून आलें. याला पुरावा भरपूर होता. पण लिंगनिर्णय हा एक वेगळा व सर्वात महत्त्वाचा पुरावा सापडला. कारण लिंग हें पेशीच्या केंद्रांतील कांहीं विशिष्ट घटकांच्या (या घटकाना 'सेक्स क्रोमोझोम्स' म्हणतात.) आकारावर आधारलेलें आहे, असें आढळून आलें. हे विशिष्ट घटक किती लांब आहेत यावर अपत्याचें लिंग पुल्लिंग कीं स्त्रीलिंग हें अवलंबून आहे. (मनुष्याच्या बाबतीत आखुड घटकामुळें अपत्याचें लिंग पुल्लिंग व लांब घटकामुळें स्त्रीलिंग ठरत असतें. उलट पक्ष्यासारख्या इतर काहीं प्राण्यामध्यें तें आखुड घटकामुळें स्त्रीलिंग व लांब घटकामुळें पुलिंग ठरत असतें.) अशा रीतीनें **अपत्याचें लिंग ठरविण्याची यंत्रणा बाह्य परिस्थितींतील बदलाशीं संबंधित नसून ती स्वतंत्र व स्वयंसिद्ध आहे.** हें स्पष्ट झालें. ही गोष्ट मान्य केल्यास, "गर्भवासाची परिस्थिति जर अधिक अनुकूल झाली तर गर्भास पुल्लिंगी कलाटणी नाहींतर स्त्रीलिंगी कलाटणी मिळणें शक्य दिसतें" हें विधान चुकीचें ठरतें.

या लिंगनिर्णयाच्या यंत्रणेमध्येंच आपणाला स्त्रीपुरुष (अगर नरमादी-) प्रमाण सारखें असतें या वस्तुस्थितीची उपपत्ति सापडते. प्रत्येक जननपेशीमध्यें एक आखुड व एक लांब घटक असल्याकारणाने व पेशीविभजना- (Meiotic division) मुळें दोन्हीहि घटक परस्परापासून वेगळे होत असल्याकारणाने त्यापासून तयार होणाऱ्या पेशी सारख्याच प्रमाणांत असतील हें उघड आहे. केवळ मनुष्याच्या बाबतींतच नव्हे तर सर्व प्राण्यामध्यें (व भिन्नलिंगी वनस्पतीमध्यें) हें नरमादी-प्रमाण सारखेंच असतें याचें कारण हेंच होय. आतां युद्धा-

नंतर मुलगे अधिक प्रमाणांत जन्मत असतात हें खरें असेल तर हें नेहमीचें स्त्रीपुरुष-प्रमाण एकदम कां बदलावें ? असा साहजिकच प्रश्न उद्भवतो. युद्धासारख्या बाहेरच्या परिस्थितीमुळें हें घडून येत असेल तर बाहेरच्या (आपणाला माहीत नसलेल्या) कारणानीं लिंगपरिवर्तन घडून येण्याची शक्यता आहे, असें मानणें स्वाभाविक आहे. याच कारणासाठीं वर उल्लेखिलेल्या लेखांत "गर्भ-वासाच्या परिस्थिती'ची यातायात केली आहे !

बाहेरील परिस्थितीमुळें लिंग ठरत नाहीं हें मान्य केल्यास बाहेरील परिस्थितीमुळे तें बदलतहि नाहीं हें मान्य करावयास पाहिजे, ही गोष्ट विशेष लक्षांत ठेविली पाहिजे. कारण कांहीं प्राण्यामध्यें (उदा: Bonellia Hydatina इ.) व वनस्पती-मध्यें (उदा:– Cucurbitaceae, Equiseta) बाहेरील परिस्थितीत घडून आलेल्या बदलामुळें वर-वर "लिंगपरिवर्तन" घडून आल्याचें दिसून येतें. हें "लिंगपरिवर्तन" प्रकाशांतील व तपमानांतील आणि कधीं कधीं अन्नांतीलसुद्धां बदलामुळें घडून येतें असें आढळून आलें आहे. वास्तविकरीत्या हें लिंगपरिवर्तन नसून लिंगप्राधान्य आहे. कारण हे वनस्पति अगर प्राणी एकलिंगी नसून द्विलिंगी (Monoecious or Hermaphroditic) आहेत. या प्राण्यामध्यें पुल्लिंगी व स्त्रीलिंगी अशी दोन्ही इंद्रियें असून बाह्य परिस्थितींतील बदलामुळें त्यांच्यापैकी एका प्रकारच्या इंद्रियाला जास्त प्राधान्य मिळतें व दुसऱ्या प्रकारचें इंद्रिय 'दडपलेलें' राहतें. ही गोष्ट एक-लिंगी प्राण्यांना लागू नाहीं. आणि मनुष्य एकलिंगी प्राणी आहे.

दुसरी गोष्ट आपण लक्षांत ठेविली पाहिजे ती अशी कीं एकलिंगी प्राण्यामध्यें असें घडून आलें तरी तें बाहेरील परिस्थितीमुळें घडून आलें असें म्हणतां येणार नाहीं. कारण गर्भाचें लिंग पेशींतील विशिष्ट घटकामुळें ठरत असल्याकारणाने लिंगपरि-वर्तन घडून येण्यासाठीं या विशिष्ट घटकामध्येंच परिवर्तन घडून आलें पाहिजे. असें परिवर्तन घडून येतें. नाहीं असें नाहीं. पण तें जननयंत्रणेच्या अंत-र्गत फेरफारामुळे घडून येतें; बाहेरील परिस्थिती-मधील बदलामुळें नाहीं. बाहेरील परिस्थितीमध्यें बदल घडवून आणून लिंग बदलण्याच्या प्रयत्नाला अजूनपर्यंत कसलेंहि यश आलेलें नाहीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

"बाह्य परिस्थितीमधील बदल" याचा अर्थ बाह्य परिस्थितीमधील भौतिक बदल होय. कारण अभौतिक बदलामुळें काहीं प्राण्यामध्यें "लिंगपरि-वर्तन" घडून आल्याचें आढळून आलें आहे. उदाहरणार्थ हर्टविग यांच्या बेडकावरील एका प्रयो-गांत ५०० अंडी ताबडतोब सुफलित (Fertilized) केलीं असतां त्यापासून २२६ नर व २१८ माद्या जन्मल्याचें व ६८ ते ७७ तासानी सुफलित केली असतां, १३ माद्या व ६७३ नर जन्मल्याचें आढ-ळून आलें. हर्टविग यांच्या मतें विलंबानें सुफली-करण केल्यास नर जास्त प्रमाणांत निर्माण होतात याचें कारण विलंबामुळें अंडीं जास्त पक्व होतात व त्यांच्यामधील स्त्रीलिंग ठरविणारे घटक तेवढ्या अव-धीत भ्रष्ट होतात, हें कसेंहि असलें तरी जास्त विलंब हा काहीं भौतिक बदल नव्हे हें स्पष्ट आहे. अर्थात् नर जास्त प्रमाणांत निर्माण होण्याचें कारण (परिस्थितीमधील बदल नसून) जननयंत्रणेंत झालेला बदलच होय.

यावरून कोणी असा निष्कर्ष काढूं नये कीं स्त्रीच्या मासिक चक्राच्या कोणत्या कालाधींत सुफली-करण होतें यावर किंवा सुफलीकरण ज्या स्त्रीपुरुषांच्या संयोगानें होतें त्या स्त्रीपुरुषांच्या वयावर गर्भाचें लिंग ठरतें ! असा निष्कर्ष काढायला कसलाच पुरावा नाहीं. बेडकासारख्या काहीं अपवादात्मक उदाहरणावरून मनुष्याच्या बाबतीत असा निष्कर्ष काढणें धाडसाचें आहे. तें कांहीहि असलें तरी "गर्भवासाच्या परिस्थिती" मुळें गर्भाच्या लिंगाला कलाटणी मिळणें शक्य आहे हें विधान मान्य करतां येत नाहीं हें वरील विवेचनावरून स्पष्ट व्हावें.

— अद्वयानंद गळतगे


आज
महाराष्ट्र
एक वर्षांचा झाला
पण त्याबरोबरच तो
भारतामधील इतर प्रदेशाएवढाच
हजारों वर्षांचा प्राचीन आहे
आपण सर्व
आदर्श महाराष्ट्रीय
आणि
आदर्श भारतीय म्हणून
सुखानें नांदू या
प्रकाशन संचालक, महाराष्ट्र सरकार मुंबई